# अनुक्रमणिका

# लेखकाचें मनोगत

" अमके पुस्तक मला काढून द्या " अशी मागणी करीत येणाऱ्या वाचकाला तें पुस्तक आपल्या संग्रहांत असलें की काढून देणें हें अगदी साधें ग्रंथालयीन काम आहे. ग्रंथालयांत नसलें नि तें देणें अवश्य दिसलें तर अन्य कोठून आणवून देणें हें थोडें जास्त आस्थेचें व हालचालीचें काम आहे. पण " मी अमक्या विषयाची विशेष माहिती गोळा करीत आहे. या विषयावर जें जें वाचनीय असेल तें तें मला कृपेनें द्या " अशा मागणीप्रमाणें काम करणें हें कर्तव्यविषयक जबाबदारीचें, जागृतीचें, जाणिवेचें नि जिज्ञासूवृत्तीचें काम आहे. गरजेशिवाय जशी आपण वस्तू घेत नाहीं, तसेंच कामहि करीत नाहीं. परंतु अशा ग्रंथालयीन कामाची गरज गेल्या कांहीं वर्षांमध्यें सावकाश आणि अविरत गतीनें निर्माण झाली आहे. या प्रकारचे पृच्छक व त्यांच्या पृच्छा यांची संख्या वाढते आहे. आणि अशी विविध प्रकारची माहिती घेतलेले नि ती देणारे- शोधशोधून काढून देणारे ग्रंथपालहि जागोजाग दिसं लागले आहेत. अशा अनेकांच्या कामामधून जे जे अनुभव, आडाखे जमा झाले ते ते अशी माहिती द्यावी म्हणणाऱ्या ग्रंथालय-सेवकांकरतां एकत्रित करण्याचा या पुस्तकाचा हेतु आहे. अर्थात् मूळ विषय अतिप्रचंड आणि घेतां येणारे अनुभव तुलनेनें व परिस्थितीनुसार मर्यादित. यानूनच या विषयाला हा आकार आला आहे.

ग्रंथालयांत येणाऱ्या अभ्यासकांना त्यांच्या वाचनाभ्यासाला पूरक असणारी माहिती व वाचनीयें देणें म्हणजेच संदर्भसाह्य. ग्रंथपालनाचा हा एक उपविषय. पुण्यात १९४७ मध्यें मराठी माध्यमाचा पहिला ग्रंथपालन वर्ग सुरू झाला. त्यावेळेपासूनच ग्रंथपालनाच्या सर्व विषयोपविषयांची रीतसर क्रमिकें व्हावीत ही गरज अध्यायकांना आणि अध्यापकांनाहि तीव्रतेनें वाटू लागली. ती वाढतहि गेली. परंतु या विषयावर पुस्तकें झालीं तर अवश्य त्या संख्येंत ग्राहकवर्ग निर्माण व्हायचा होता. शिवाय लेखनापूर्वी भरपूर कामाची व अध्यापनानुभवाची फार गरज होती.

महाराष्ट्रांत ग्रंथालयांची सुरुवात होऊन आतां सव्वा शतक लोटलें असलें तरीहि सर्वसामान्य जनांपर्यंत आत्तां आत्तां पावेतो ग्रंथालय पोचलेलें नव्हतें. कारण बहुतः तीं सर्व ग्रंथालयें वर्गणी ग्रंथालयें होतीं. त्यामुळें सामान्यजन वाचक झालेला नव्हता आणि वर्गणीच्या बंधनामुळें वाचकगण बव्हंशा अगदीं परिमित होता. या परिस्थितींत ग्रंथालयीन काम, ग्रंथालयीन सेवा, संदर्भसाह्य इत्यादींस अवसर कोठला असणार ! हें करणारा ग्रंथपाल तरी कसा जन्मणार ! सरकारच्या योजनेनुसार १९४७ पासून सरकारी अनुदान पद्धतीमुळें सर्व सामान्य जनांस खुल्या झालेल्या मुक्तद्वार ग्रंथालयांच्या स्थानें लोकांस 'ग्रंथालय' माहिती झालें. जागोजागच्या मुक्तद्वार ग्रंथालयांमुळें अनेक कार्यकर्ती मंडळी ग्रंथालयकार्या-

साठीं पुढें सरसावू लागली. त्यांच्या कार्यांमुळें आणि १९४७ च्या आगेमागें चारदोन वर्षें महाराष्ट्रांत चालू झालेल्या व आजतागायत अव्दंश अखंड असलेल्या संघटन-कार्यांमुळें 'ग्रंथालय चळवळ' सामान्य जनांस परिचित झाली. १९४७ मध्यें मराठी माध्यमांत पुण्यांत सुरू झालेल्या व त्याचप्रमाणेंच आतां कालक्रमांत तीन चार ठिकाणी चालत असलेल्या ग्रंथपालनवर्गांमुळें 'ग्रंथपाल' हा एक नवा व्यवसायिक जन्मला. या वर्गांमुळें उगम पावून वर्गीकरण, सूचिलेखन, दाखलनोंद, देवघेव, संदर्भसाह्य इत्यादि ग्रंथालयीन परिभाषा सर्व महाराष्ट्रभर पसरते आहे. त्या परिभाषेमुळेंच लोकांस अलिकडे 'ग्रंथपालन' हा एक नवा अभ्यासविषय सापडला आहे. आणि त्यासाठीं ग्रंथालयीन क्रमिकें व साहित्य कालक्रमशः प्रसिद्ध होत असल्याचें आढळतें आहे.

ग्रंथपालनवर्गांच्या प्रथमवर्षी म्हणजे १९४७ मध्येंच त्या वर्गाला व तत्कालीन ग्रंथपालनविषयक जागृति आणि गरज यांस अनुरूप असें 'संदर्भ साह्य' ह्या विषयाचें छापील चार फॉर्मांचें होईल, एवढें हस्तलिखित आमच्यापैकींच एक त्या वर्षी अध्यापक असलेले श्री. कोल्हटकर यांनीं तयार केलें होतें. परंतु त्याची कालमानानुरूप वाढ नि प्रगति त्यावेळीं ग्रंथरूपात करतां आली नाहीं. १९४७ पासूनच्या सतत सोळा वर्षांच्या कालावधींत अखंड चालू असलेल्या आमच्या ग्रंथपालनवर्गांत तीन चार अध्यापकांनीं या विषयाचा विस्तृत अभ्यास वर्गापुढें मांडला. तो सर्व यथाशक्य संकलित व संवर्धित करून ग्रंथपालन वर्गांच्या आणि या विषयाच्या विद्यार्थी जिज्ञासूंकरतां आतां या पुस्तकाच्या स्वरूपांत परिणत होत आहे.

१९४७ पासून सोळा वर्षेपर्यंत हें पुस्तक तयार होणें लांबत आलें. आणखी अनुभव मिळावा, आणखी काम हातून व्हावें, मराठींत हा विषय नव्यानें थावयाचा आहे म्हणून तो शक्य तितका नीट यावा असें वाटण्यामुळें हा कालावधि लागला. या व्यवसायांतल्या आम्ही एकत्र येऊन हें काम यथाशक्ति पूर्ण केलें, याचा आनंद होत आहे. मराठींत हा विषय या प्रमाणांत प्रथमच पुढें येत आहे हें ज्ञानभान आम्हांस आहे. त्यामुळेंच त्याच्या अपूर्णपणाचीहि योग्य जाणीव आम्हांस आहे. परंतु अपूर्ततेची पूर्तता करा, हा तपशील वाढवा, तो कमी करा, आणखी अधिक माहिती मिळवून भर करा, येथें हें फिरवा, तें ग्रंथें घ्या इत्यादि करण्यांत यातायात वाढत जाते. अनिश्चय नि अविश्वास बळावतो. कार्याचा आरंभहि होत नाहीं.

स्वराज्यासमवेतच आगेमागें मुक्तद्वार ग्रंथालयें, ग्रंथपाल व ग्रंथालयसेवा हें सर्व आलें. ग्रंथपालांवर, विशेषतः विद्यालयीन ग्रंथपालांवर आपल्या वाचकाभ्यासक-समूहाला चौरस ज्ञान व माहिती देण्याची मोठी जबाबदारी आतां आहे.

त्यासाठीं आपल्या ग्रंथालयांत काय काय आहे त्याची, तेथल्या सूचीची व वर्गीकरणाची संपूर्ण माहिती या ग्रंथपालांना असली पाहिजे. ती त्यांच्या जिव्हाग्रीं आणि कराग्रीं सतत वसत असली पाहिजे. म्हणजेच हरविध संदर्भांची मागणी येतांक्षणीच किंबहुना मागणीचा अंदाज करूनहि मागितलेली माहिती देणें–सुचविणें शक्य झालें पाहिजे. ग्रंथालयातील साहित्याचा नि जीवनांतील विविध नित्यनैमित्तिकांचा एकमेळ घालून चौफेर माहिती त्यांनी दिली पाहिजे. विद्यालयामध्येंच संदर्भ म्हणजे कोणते, ते कसे वापरावे याचें ज्ञान दिले जावें. पण अजूनहि तें दिलें जात नाहीं. कारण त्याची कल्पनाच कोठें दिसत नाहीं. यापुढें तरी सर्व माहिती घेतलेले त्या तोलाचे ग्रंथपाल असावे व त्यांना हें काम दिलें जावें. संदर्भ ग्रंथ कसे असतात, त्यांचे विशेष कोणते ही माहिती नवीन वर्गाच्या आरंभकाळीं त्याचेकडून विद्यार्थ्यांना दिली जावी. ग्रॅज्युएटांनासुद्धां डिक्शनरीची सर्व माहिती झालेली नसते. ती फार लौकर देणें इष्ट व अवश्य आहे. अर्थात् हें काम केवळ ग्रंथालान्त परीक्षा झालेल्यांचें नाहीं. आगगाडी या मोटार चालवण्यासाठीं तें शिक्षण संपूर्ण घेतलेलें हवें. सर्व देशबांधवांसाठीं सदिच्छा व सेवाभाव आहे याच गुणामुळें कोणीहि वैद्य डॉक्टरांप्रमाणें औषध देण्याचें काम करून चालणार नाहीं. त्या त्या विषयाचें शिक्षण अवश्य हवें. ग्रंथालयांत ज्ञानभांडार सांठतें. त्याची माहिती व तद्वीच ती कशी, कशांतून, कोणाला व किती द्यावी ही माहिती ग्रंथालयाचें काम करणारांना हवी. पण लोकांना ग्रंथपालनाचें शिक्षण म्हटलें कीं आश्चर्य वाटतें. मग ग्रंथालयांमध्यें वाचकांना माहिती देणारे मार्गदर्शक–संदर्भ-साहाय्यक नेमलें जावें असें सुचवलें तर महदाश्चर्यच वाटेल ! पण त्याचा समय आला आहे. ' माहितगार ग्रंथपाल नेमा ' हें आतां सुचवलेंच पाहिजे. आणि ही सूचना स्वीकारली गेली पाहिजे.

ह्या पुस्तकाच्या मूळरूपाचा उपयोग करणाऱ्या वर्गाच्या अनेक माजी विद्यार्थ्यांना हा विस्तार पाहून आनंद वाटेल. मुंबईच्या सिद्धार्थ कॉलेजचे साक्षेपी व साहित्यिक ग्रंथपाल आमचे स्नेही श्री. शां. शं. रेगे यांनी मागितली ती मदत अनलसतेनें दिली. महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथले साहाय्यक श्री. वि. त्र्यं. क्षीरसागर यांनीं संदर्भोपयोगी साहित्याचीं उदाहरणें म्हणून अनेक पुस्तकें दाखविलीं. संघकार्यवाह श्री. या. वि. भट व इतर संघसदस्य यांनीं हें पुस्तक संघाचें प्रकाशन म्हणून स्वीकारलें. या सर्वांस मनःपूर्वक धन्यवाद.

या पुस्तकाच्या प्रकाशनासाठीं पुणें-विद्यापीठाने दिलेल्या तीनशें रुपयांच्या अनुदान साह्याबद्दल लेखक पुणें विद्यापीठाचे ऋणी आहेत.

पुणें, दि. ५ डिसेंबर १९६२ —लेखक

# महत्त्वाच्या मुद्रणदुरुस्त्या

| पान | ओळ | दुरुस्ती मजकूर |
|---|---|---|
| ३ | १३ | या माहितीमुळें |
| ४ | २८ | वस्तु मागून वस्तु |
| ७ | २० | नेणाऱ्या वाटाड्याचें |
| ७ | ३३ | संग्राहकाचा |
| ८ | १ | मालासंपादकाचा |
| ८ | २ | अनेक विषयी |
| ८ | १६ | तयार मिळावी अशी |
| ११ | २३ | संदर्भसाह्य |
| १२ | २५ | व मदत देण्याचें |
| १८ | २७ | एका ग्रंथालयांत |
| १९ | १ | असतील तर व तितपत |
| १९ | २९ | सहावें ज्ञानेंद्रिय ...अपूर्वज्ञानेंद्रिय |
| २१ | २६ | अनेक सर्वमान्य |
| २१ | ३७ | ग्रंथांस ज्या अर्थानें |
| २२ | १ | भावी पिढ्यां |
| २२ | १७ | नियतकालिकें, घडिकें |
| २३ | ३ | प्रकरणें व परिशिष्टें |
| २३ | ६ | दृष्टिकोनांनीं तपासणें |
| २३ | २३ | लक्षात घ्यावें लागतें |
| २३ | ३१ | सांवत्सरिकें ( म्हणजे यीअरबुक्स ) |
| २४ | २९ | चरित्रकोश व शब्दकोश |
| २५ | ८ | मूल्यमापनानंतरची |
| २६ | ७ | एकूण अध्ययानंत |
| २६ | २३ | त्यासारखे प्रदेशवार |
| २७ | १ | उच्चनीचभाव येऊं न देता |
| २७ | १७ | पुस्तकामागून पुस्तकें, नियतकालिकामागून |
| २७ | २४ | सुनिष्पन्न संदर्भग्रंथ |
| २८ | ३२ | किती प्रयास पडला ! |
| ३६ | २२ | भक्त्यैव तुष्टिमभ्येति |

| पान | ओळ | दुरुस्ती मजकूर |
| --- | --- | --- |
| ३८ | ६ | त्यांच्या आद्याक्षरवारीनें |
| ३९ | १० | हा ग्रंथराज पुराणा |
| ३९ | ११ | हें निस्संशय. |
| ३९ | ३२ | इतिहास" यावरून येते. |
| ४० | ६ | देशकालवर्तमानानुसार |
| ४० | १२ | मागांचा व्यावहारिक ज्ञानकोश |
| ४४ | १६ | त्या त्या कालक्रमातली ताज्यांतली |
| ५० | २५ | देणारीं पुस्तकें |
| ५४ | ४ | इंग्रजी संदर्भग्रंथ |
| ५५ | १ | हेरिंग्लर (ए) व ॲबट |
| ५५ | १३ | आधुनिक शास्त्रीय जगत् |
| ५५ | १७ | अनेक विद्या मूलतत्त्वसंग्रह. |
| ५५ | २२ | सुरुवात १९२७ |
| ५९ | ६ | गुमे (रा. स.) व |
| ६५ | ११ | नाट्य व चित्रपटकला |
| ७१ | २ व ३ | नियमानुसार मोठ्या आद्याक्षरानें |
| ७४ | २९ | बेलसरे (एम्. घी.) |
| ८१ | १७ | कीसिंग्ज काँटेंपोररी |
| ८६ | २४ | तुलनेनें अति थोडें आहे. |
| ८७ | १० | आणि आपला संदर्भविभाग |
| ८७ | १८ | अजून सर्व सामर्थ्यानिशी |
| ८७ | ३१ | शीघ्र म्हणजे तात्कालिक |
| ८८ | २६ | मुक्त वाटप करण्याच्या |
| ८८ | ३० | रोजच्या रोज कांहीं ना कांहीं |
| ९४ | १४ | संकीर्ण निबंधांमधील |
| ९७ | १६ | ग्रंथालयाच्या पसाऱ्यावर |
| ९९ | २६ | viz, ibid ह्या शब्दांचा |
| १०० | १ | १९५७ मध्ये |
| १०० | २० | 'मानसशास्त्रावर मराठींत |
| १०१ | २५ | History' चें मराठी भाषांतर. |
| १०२ | १६ | गंटोबाची आरती व स्तोत्रें |

---

# संदर्भ साह्य

## ग्रंथालयीन विचारांची वाटचाल

**ग्रंथालय व ग्रंथसंग्रह**—'ग्रंथालय म्हणजे ज्ञानाचें सदावर्त', 'ग्रंथालय म्हणजे जनतेचें विद्यापीठ'. ग्रंथालयासंबंधीच्या या कल्पना आज दृढ होत चालल्या आहेत. ग्रंथालय म्हणजे केवळ ग्रंथांचें आलय, जपून सांभाळण्याच्या ग्रंथांच्या संग्रहाची जागा हा त्याचा प्राचीन अर्थ आज उरलेला नाहीं. प्राचीन काळीं ग्रंथ दुर्मिळ होते. जर केव्हां एखादा ग्रंथ गहाळ झाला तर तो पुनरलभ्य गणावा लागे. म्हणून ग्रंथालयें सर्वत्र असूं शकत नव्हती. ग्रंथसंग्रहाचा सतत सांभाळ कसा होईल यावरच विचारवंतांचें लक्ष केंद्रित झालेलें असे. पुढील पिढीचे हातीं जमविलेला ग्रंथसंग्रह सुरक्षितपणें देता यावा हीच प्रामाणिक इच्छा संग्रहसंरक्षणामागें होती.

**ग्रंथसंग्रह म्हणजे कष्टसाध्य काम**— ग्रंथसंग्रहाचा सांभाळच जास्तींत जास्त व्हावा, त्याचा उपयोग कमी झाला तरी हरकत नाहीं ही प्रवृत्ति होण्यामागें एक बलवत्तर कारण होतें. मुद्रणाच्या शोधापूर्वी ग्रंथनिर्मिती ही एक अत्यंत कष्टदायी गोष्ट होती. त्या प्राचीन काळांत हातानें लेखन करूनच ग्रंथनिर्मिती होत असे. एक पुस्तक नकलण्यांत वर्षं वर्षं जात असे. 'महाभारत' या ग्रंथराजाची प्रत करणें म्हणजे समग्र आयुष्यभर पुरणारें काम असें म्हणत. अशा कष्टसाध्यतेमुळें ग्रंथ क्वचितच आणि अतिशय प्रयासानेंच तयार होत. आणि म्हणून त्या काळांत ग्रंथांचें जतन करणें, ते सांभाळून ठेवणें हेंच महत्त्वाचें ठरून गेलें. ग्रंथलेखकहि ग्रंथलेखन संपवितांना अशी विनंती करून ठेवीत, "अहा, लेखन करतांना पाठ, कंबर नि मान पार मोडून गेली आहेत. डोळे जळजळ करीत आहेत. तोंड मारसें गार्‍हाणें करून

बसावें लागलें आहे. असे कष्ट घेऊन हें लेखन पुरें करावें लागलें. म्हणून आतां तुम्हीं मंडळींनी त्याचा काळजीपूर्वक संभाळ करावा." संस्कृत मूळ श्लोक असा आहे— भग्न पृष्ठ कटि ग्रीवम् तसादृष्टिः अधोमुखात्। कष्टेन लिखितं शास्त्रं यत्नेन परिपालयेत् ॥

**कष्टलभ्य ग्रंथांची दुर्लभ संग्रहस्थानें** — ग्रंथलेखन असें कष्टसायासाचें असल्यामुळें ग्रंथसंग्रहहि क्वचितच आढळणारे होते. राजेरजवाडे, अमीर उमराव यांनाच हे संग्रह जमविणें व त्यांचें जतन करणें हें शक्य होतें. कोणाहि सामान्य-जनाकडून या कोठल्याहि सामान्य जनांकरता संग्रह ठेवले जाणें ही दुर्लभ गोष्ट होती. ग्रंथांच्या दुर्लभत्वामुळेंच त्यांचा उपयोग होऊं देण्यापेक्षा त्यास त्यांचा उपयोग करूं म्हणणारांपासून दूर बंदिस्त ठेवणें हीच प्रवृत्ति अपरिहार्यपणें वाढली. भरपूर मूल्य मोजून उपलब्ध झालेल्या ग्रंथसंग्रहाचें तेल, पाणी, कृमिकीटक, आग यांच्याप्रमाणेंच माणसाच्या हातांपासूनहि रक्षण व्हावें अशी कटाक्षपूर्वक दक्षता घेतली जाऊं लागली. संग्रह जमविले गेले. पण ते बहुमोल भांडारें म्हणून सामान्य जनापासून दूर बंदोबस्तांत ठेवले गेले.

**'ग्रंथ उपयोगासाठीं आहेत' या विचाराची प्रतिष्ठापना**—परंतु कोण-तीहि एक परिस्थिति त्रिकालाबाधित राहूं शकत नाहीं. जुन्या गोष्टी, समजुती, रीती जातात व त्यांच्या जागी नव्या गोष्टी येतात. ग्रंथ, ग्रंथालयें व ग्रंथवाचन या संबंधीच्या जुन्या समजुती कालांतरामध्यें पार बदलत आल्या. 'ग्रंथ उपयोगासाठीं आहेत' हें ग्रंथपालनाचें आद्य सूत्र आहे. त्याच्या प्रभावानें ग्रंथसंग्रह बंदिस्त राखण्याच्या परंपरागत प्रवृत्तीचा पगडा हळूहळू कमी होत आला. त्याच्या वेगवेगळ्या अवस्थां-संबंधीं थोडक्यांत असें म्हणता येईल: प्राचीनतमकाळीं ग्रंथ त्यांच्या कपाटामधील स्थानांना साखळ्यांनीं जखडून ठेवलेले असत. प्रथम त्या शृंखला दूर केल्या गेल्या आणि जुनी मोड म्हणून काढून टाकल्या गेल्या. संग्रहालयांचीं व कपाटांचीं दारें केवळ थोड्या विशिष्ट वाचकांस खुलीं झालीं. नंतर ज्यानी वर्गणी दिली त्यांनाच पुस्तकें उपयोगिण्याचा परवाना मिळाला. यापुढची पायरी म्हणजे पुस्तकें सर्वजनांना फक्त ग्रंथालयांतच वाचन करण्याच्या अटीवर, विनावर्गणी उपलब्ध होऊं लागली. या नंतर वशिल्यानें केवळ विशिष्टांपुरतीच घरच्या देवघेवीची सवलत दिली गेली. कालक्रमानें वर्गणी देणाऱ्या सर्वांसच ही सवलत सरांस देण्यांत आली. अगदीं अलि-कडे सर्वजनांसाठीं विनावर्गणी ही सोय केली जावी असा विचार रूढ होत आहे. ही वाटचाल अखंड चालूच आहे. प्राचीन ग्रंथालयांमध्यें सामान्य जनांना मज्जाव असे. तो मज्जाव पार इतिहासजमा होऊन आज कोणाहि जिज्ञासूने, अभ्यासकानें मागणी केलेला केवळ एकच नव्हे तर त्याविषयावरचे अनेक ग्रंथ व अन्य वाचनीयें त्यास देणें हें ग्रंथालयीन सेवेचें कर्तव्य मानलें जाऊं लागलें आहे.

**अधिक वाचनांत साह्य**—कालांतरामध्ये ग्रंथालयाचा नदिस्तपणा जसा कमी होत गेला तसाच ग्रंथालयामधील बहुविध वाचनीयाची, ती हवी म्हणणारापुढें जाहिरात करावी ही प्रथा दृढावत गेली. कोणत्याहि दुकानातल्या व्यवहाराप्रमाणेंच हें घडत आलें केवळ मागितला जिन्नस कसातरी बाधून देण्यापेक्षा तो जिन्नस निवडून पारखून, लग्न वेधानें असा अनुगुठून ग्राहकाच्या हाती द्यावा ही जशी दुकानदारीच्या रीतीमधील प्रगति दिसून आली आहे त्या प्रमाणेंच ग्रंथालयांत येणाऱ्या वाचनाभ्यासकाच्या सेवेविषयी रीतिकृती बदलत आल्या आहेत ग्रंथालयाच्या ग्रंथनिर्मीत मानवाच्या गफलती नि प्रगति यातून मिळालेलें बहुमोल ज्ञानधन साठलेलें असतें मानवानें संपादिलेला अनुभव, यश, विचार त्यांत कणाकणानें एकत्रित झालेला असतो प्राचीन काळापासूनच्या पूर्वजांचें आपल्या देशांतील वा परदेशांतील ज्येष्ठ विचारवंतांचें विचारधन येथें साठविलें जातें. हें धन गरजू जनांना उपलब्ध करण्याचा विचार हळूहळू प्रस्थापित होत आला. गरजू जनांना तें उपलब्ध करून देण्यात तो उणा तर नाहीच उलट त्याची वाढ होण्याचाच संभव दिसतो. माहितीमुळें ग्रंथालयातील असंख्यविध वाचनीयाची माहिती देण्याकडे नव्या काळातील ग्रंथालयाची प्रवृत्ति होत आहे. गेल्या अर्ध शतकात सर्व सामान्य जनांना शिक्षण देण्याची प्रवृत्ति वाढीस लागलेली आहे. या भारतांत सत्तीच करण्यात येत आहे. परंतु या सोयीचा लाभ मिळून जे शिक्षित होतात त्यांच्यासाठीं वाचनीयें पुरविण्याची कोणतीहि सोय नसल्यानें या नवशिक्षितांचें ज्ञान नाहीसें होऊ नये म्हणून सरकारनेच त्यांच्यासाठीं वाचनालयाची सार्वजनिक सोय करून दिली पाहिजे ही जाणीव वाढत आहे. पश्चिमी देशामध्यें ग्रंथालय कायदे करून ही सोय सार्वत्रिक करणें हें सरकारचें कर्तव्य मानलें जात आहे. या प्रवृत्तीतून स्थापन झालेल्या ग्रंथालयांनी आपल्या वाचकाभ्यासकांना आपणाकडे वळविण्यासाठी विविध रीतीकृति अवलंबाव्या या विचाराची उत्तरोत्तर जोरात वाढ होत आहे. आपल्या देशातहि मुक्तद्वार ग्रंथालयाची व विनावर्गणी वाचनाची सोय सुरु झाली आहे. आणि वाचकाभ्यासकांनी वाचनाभ्यासासाठी ग्रंथालयाकडे नित्याची गरज नि सवय म्हणून वळावें अशी प्रवृत्ति त्यांचेमध्यें आणण्याचे ग्रंथालय चालक व ग्रंथपालमंडळी अधिकाधिक प्रयत्न करीत आहे जणू काही हा मंडळी म्हणजे विक्रेते, वाचक मंडळी म्हणजे ग्राहक आणि ग्रंथालय म्हणजे दुकान या यथार्थ जाणिवेनें कार्य होऊ लागलें आहे. आलेले वाचक सदैव आकृष्ट रहावे, त्याच्याप्रमाणेंच आणखी नागरिक वाचक म्हणून ग्रंथालयाकडे वळण्यास प्रवृत्त व्हावे, ते ग्रंथालयात आल्यावर त्यांना हवें तें वाचनसाहित्य सुलभ असावें, तें तें साहित्य त्यांच्या हातीं कमीत कमी वेळात मिळावें या ध्येयाचा नि जबाबदारीचा प्रभाव दिसू लागला आहे. या कामासाठीं ग्रंथालय चालक व ग्रंथपाल यांनी काहीं विशिष्ट तंत्र ठरविलें आहे व त्या तंत्रानुसार व्यवस्था ठेवण्याचा

प्रयत्न चालू आहे. हें तंत्र म्हणजे ग्रंथालयांत कराव्या लागणाऱ्या पुढील सात गोष्टी होत.

(१) सर्व पुस्तकांची क्रमवार मांडणी म्हणजेच वर्गवार स्थानव्यवस्था.

(२) पुस्तकांच्या कपाटांवरील वर्गदर्शक म्हणजेच विषयदर्शक पाट्या.

(३) पुस्तकाच्या विषय, लेखक, ग्रंथनाम, ग्रंथांश व इतर महत्त्वाच्या असणाऱ्या अंगोपांगांच्या नोंदींची सूचीपत्रें.

(४) ग्रंथालयांतील सोईंची व वाचनीयांची माहिती देण्यासाठीं एका सेवकाची नेमणूक.

(५) ग्रंथालयाच्या कामाची व प्रगतीची जाहिरात.

(६) वाचकांचें ओळखपत्र व घरीं नेण्याच्या पुस्तकांची संख्या दाखविणारीं संख्यापत्रें.

(७) उघडीं म्हणजे मुक्तद्वार कपाटें.

वाचकांना ग्रंथालयांत आणि ग्रंथांच्या जवळ आणणें व त्याचप्रमाणें ग्रंथच वाचकांच्या जवळ नेणें म्हणजेच येणाऱ्या वाचकास हवें तें वाचनीय देणें व त्याचप्रमाणें प्रत्येक पुस्तकाला त्याचा वाचक देणें हें ग्रंथालयीन ध्येय साधण्यासाठीं वरील गोष्टी करण्यांत येतात.

## ध्येय व कार्य यांचीं साह्यकर आवश्यकें

**ग्रंथनिविष्ट स्मृति**—मानवाला अनादिकालापासून मिळालेले अनुभव, त्यामधून एकत्रित झालेले बहुमोल नि बहुविध विचार आणि नवनवीन कार्यांच्या दृष्टीनें सुचवलेली दिशा यांचा संचय ग्रंथनिधींत असतो. म्हणजेच अनेकविध ज्ञान ग्रंथालयांत गोळा झालेलें असतें. हें ज्ञान अपार आहे. साध्यासुध्या गोष्टींचें ज्ञान करून घ्यायलाहि थोडा वेळ मोडतोच. ज्ञानविश्वांतील एकच विषय घेतला तरी तो इतका अनंत नि अपार आहे कीं त्याच्या अध्ययनाला सामान्य व्यक्तीचें आयुष्य पुरें होईल याची खात्री नाहीं. मात्र प्रत्येक व्यक्तीला अनेक विषयांची जुजबी माहिती तरी आवश्यक असते. पुष्कळदा ही माहिती अगदीं क्वचित् आणि तीहि अल्पकाळापुरतीच हवी असते. अशी माहिती आपल्या स्मृतीच्या कोणत्या एखाद्या कप्प्यांत ठेवून तेथली जागा अडवून ठेवणें योग्य नाहीं. केव्हांतरी उपयोगी पडेल म्हणून त्या त्या वेळीं खरोखरी नको असणारी वस्तु मागून आपल्या घरांत आणली व साठविली गेली तर अडगळ जमा होण्याचाच संभव अधिक. वृद्धपणीं ज्याची आधाराकरतां जरूर लागेल तो तिसरा पाय म्हणजे काठी आणि काचेचे जोड डोळे, ऐन पंचविशींतच उगाचच दूरदृष्टी दाखविण्याच्या भरीस पडून कोणीहि आणून ठेवणार नाहीं. ऐन वैशाखांत, कदाचित् थंडी पडेल म्हणून असावा अशी कल्पना करून आपल्या

अंगावर कोणीहि ऊवरला म्हणजे स्वेटर-चढविणार नाहीं. त्याचप्रमाणें आयुष्यांत अल्पकाळच जी माहिती केव्हांतरी लागेल ती आपल्या मर्यादित स्मृतिपथांत अडगळीप्रमाणें कोणीहि ठेवूं म्हणणार नाहीं. नेहमीच्या व्यवहाराकरतां आपणी ही स्मृती सदैव ताजी, तत्पर नि तयार ठेवणें श्रेयस्कर आहे. हिला शरीरांतर्गत स्मृती म्हणूं या. कधीकाळी लागणाऱ्या माहितीकरतां ही शरीरांतर्गत स्मृती अडवून न ठेवतां ग्रंथांतर्गत किंवा ग्रंथनिविष्ट स्मृती उपयोगिणें श्रेयस्कर. ही ग्रंथनिविष्ट स्मृती आपल्या सेवेसाठीं सतत सिद्ध असते. तिचें साह्य घेणें इष्ट आहे. या अभिनव, अपूर्व, अश्रुतपूर्व अशा स्मृतीचा म्हणजे ग्रंथनिविष्ट स्मृतीचा उपयोग ग्रंथालयांत येणाऱ्या वाचकाभ्यासकांना करूं द्यावयाचा असतो. त्यासाठीं येणाऱ्या प्रत्येकास या स्मृतीचा एकएक कप्पा खुला करून द्यावयाचा असतो. ग्रंथालयाच्या अद्ययावत् कल्पनेप्रमाणें ग्रंथालयांत ज्ञान भांडार नुसतें साठवायचेंच नसतें, तर तें सर्व गरजूंच्या उपयोगाकरतां शरीरांतर्गत स्मृतीप्रमाणेंच सदैव सिद्ध ठेवायचें असतें. अनेक प्रकारची माहिती ग्रंथालयांत येईल तशी, केव्हां ती ग्रंथालयांत न येतांहि तिला कोणत्याहि क्षणीं मागणी येणार असें गृहीत धरून सज्ज ठेवणें जरूर आहे. ती तशी तयार, तत्पर नि ताजी राखली आणि गरजूंस हवी त्या क्षणीं दिली तरच त्या संग्रहाचा, त्याची व्यवस्था राखणारांचा आणि ग्रंथपालनाच्या शिक्षणानुभवाचा उपयोग. पण ग्रंथपाल झाला तरी तो एक माणूसच आहे. माहिती ध्यानांत ठेवून तरी तो किती ध्यानांत ठेवणार? या करतांच वर उल्लेखिलेल्या तंत्रबद्ध गोष्टी ग्रंथालयांत अवलंबाव्या लागतात. त्यांची विस्तारानें माहिती घेणें जरूर आहे.

(१) **ग्रंथांची स्थानव्यवस्था** — ग्रंथालयांत आलेल्या, येत असलेल्या व येईल त्या ग्रंथ, कालिकें, मालिकें (म्हणजे सीरियल्स), घडिकें (म्ह. पॅम्फ्लेट्स् व फोल्डर्स) इत्यादि संग्रहाची व्यवस्था म्हणजे मांडणी करण्याचें काम कुशलतेने नि योजकतेने करावें लागतें. ही मांडणी कपाटांमध्ये करावयाची असते. पहिल्याने अर्थात् असतील तींच व तशींच हालचालीला आणि पुस्तकें काढण्या-ठेवण्याला शक्य तितकीं सोइस्कर अशी कपाटें लावून घेतलीं पाहिजेत. कपाटें एकदां लावून झालीं कीं पुस्तकें कांहीं विशिष्ट संकेत-सोईने, कोणत्याहि अनपेक्षित क्षणी नेमकीं नि हुकमी मिळतील अशा विशिष्ट स्थानीं ठेवावयाचीं असतात. तीं तशीं ठेवणें म्हणजेच पुस्तकांचें वर्गीकरण करणें. कार्यक्षम अशा शालेय ग्रंथालयाचें उदाहरण घेऊं. माहे ऑगस्टमधील एका दिवशीं पहिला तास सुरू होण्यास तीन चार मिनिटें असतांनाच सातवींतून दोन वर्षांपूर्वीच्या सहामाहीच्या प्रश्नपत्रिकांची मागणी येईल. तिसऱ्या तासाला नववींतून विद्यार्थी येईल व गिरीशांची माहिती देणारें पुस्तक मागेल. सहावा तास सुरू झाल्यावर विज्ञानशिक्षकांना मध्येंच आठवण होईल आणि पांचवीचा चिमखडा चटपटीत चिटणीस उत्सुक मुद्रेने ग्रंथालयांत

शिरून 'ल्थर वरबँक 'ची माहिती मागेल. चार दोन क्षणांतच ग्रंथपालाचे हातून ती माहिती व कांहीं चित्रेंहि तो अधीरपणें हातांत घेऊन, "फारच छान चित्रें आहेत हीं. मोठं काम झालं. काम झाल्याबरोबर घेऊन येतो" असें कसेंबसें पण न राहवून म्हणत म्हणत आनंदानें जवळ जवळ पळतच तो वर्गाच्या मार्गाला लागेल. त्या त्या वेळचा तो आपल्या तत्परकृतीसंबंधींचा उच्चार ग्रंथपालाला आनंद देणारा होणारच. आणि त्या आनंदाला कारण ठरणाऱ्या स्वतःच्या कामाचें समाधान त्याच्या चेहऱ्यावर उमटणारच. वृत्तपत्रीय व महाविद्यालयीन ग्रंथालयांतीहि अशीच उदाहरणें गोळा करतां येतील. मागितली ती ती माहिती नेमकी काढून देण्याकरिता ग्रंथादि सर्व वाचनीयें कांहीं एका संकेतानें लावणें अवश्य आहे. आपण ज्या ज्या आठवणी मनांत ठेवतो त्या त्या कोणत्या तरी संकेतानें ठेवतो. संगति आणि गणती यांवर अनेक आठवणी आधारलेल्या असतात. इतिहासांतील हकिगती आपण कालक्रमवार ध्यानांत ठेवतो तर भूगोलातील अनेक तपशील स्थलक्रमाने समोर येतात. ललित वाङ्मयात आपल्या स्मरणशक्तीला लेखकांच्या नांवांचें साह्य होतें. संगतीच्या या गणतीच्या एखाद्या ठराविक क्रमाने काम करणें स्मृतिसाहाय्यक ठरतें. ग्रंथसंग्रह कपाटांतून स्थानांकित करतांना हें तत्त्व ध्यानांत घेऊनच तें काम करावें लागतें. वर्गीकरणाचीं सूत्रेंहि या स्मृतिसाहाय्यकत्वाच्या तत्त्वावरच बसविलेलीं आहेत. वर्गवारीच्या सूत्रबद्धतेमुळें कोणत्याहि क्षणीं कोणाहि वाचकानें कांहींहि मागितलें कीं त्या त्या वर्गांत – विषयांत ग्रंथपालाचा हात आपोआप आणि नेमकाच शिरतो. स्थानवारीमुळें सर्व वाचनीयें सहज सुलभ ठरतात.

(२) कपाटांवरील विषयदर्शक पाट्या — पुस्तकांची स्थानवारी म्हणजेच जें वर्गीकरण केलेलें असेल तें पुस्तकांचा शोध करणारांना समजलें पाहिजे. यासाठीं आधीं वर्गवारीनुसार किंवा वाचकांकडून येणाऱ्या मागणीच्या प्रमाणानुसार कपाटें मांडून घेतलीं पाहिजेत. देवघेवीच्या म्हणजेच पुस्तकें कपाटाबाहेर काढण्याच्या सोईकरता वाचनीयांना येणाऱ्या मागणीच्या प्रमाणानुसार संग्रहाच्या स्थानव्यवस्थेंत कांहीं फरक करावा लागेल. कपाटें मांडल्यावर ज्या क्रमाने पुस्तकें लावण्यांत येतील त्या क्रमानुसार तो तो वर्ग–विषय दाखवणाऱ्या पाट्या कपाटांच्या माथ्यावर लावाव्या. ह्या पाट्या केवळ तंत्रमय भाषेंत असूं नयेत. तंत्राची भाषा सांकेतिक चिन्हांची असते. लघुता, स्मृतिसाहाय्यकता, नात्यानुसारिता, तंत्रबद्ध भाषेमुळेंच साधतात व म्हणून त्या भाषेची आवश्यकता आहे. पण ग्रंथांचा शोध करणारानाहि तंत्राची सांकेतिक चिन्हें परिचित करून दिल्यास त्यांचा फायदा होईल. म्हणून कपाटांवरच्या पाट्यांवर आधी सामान्य भाषेंतला शब्द व त्याखालीं तंत्रांतलें चिन्ह ठेवावें. म्हणजे ज्ञातावरून अज्ञाताकडे लोक वळतील. वर्गीकरणाची भाषा कांहीं कालावधींतच त्यांच्या परिचयाची होईल आणि तिच्यासंबंधींची "हें एक खूळ आहे! इतकं

हें हवं आहे कशाला ? ह्या सांकेतिक भाषेचं ज्ञान, ग्रंथपालांनो, तुमचं तुम्हालाच लखलाभ होवो ! आम्हाला नि इथे तें नको... " असली कुत्सेची नि तुटकपणाची भावना क्रमानें मावळेल. वर्गीकरणाची भाषा सर्व वाचकाभ्यासकांना क्रमाने सहजासहजीं कळूं लागावी असा प्रयत्न त्यांना नकळत ग्रंथपालांनीं केला पाहिजे. वर्गदर्शक पाट्यांप्रमाणें ग्रंथालयाच्या देवघेव विभागाच्या अगदी तोंडाशींच, येणाऱ्या जाणाऱ्यांच्या सहज नजरेस पडेल असा वर्गवारीचा तक्ता ठळकपणें रंगविलेला लावून ठेवावा. मुंबईचें मराठी ग्रंथसंग्रहालय, पुण्याचें नगर वाचनमंदिर, केसरी संस्थेचें ग्रंथालय या ठिकाणीं त्यांच्या वर्गीकरण पद्धतीची वर्गदर्शक अक्षरें आंत शिरल्याबरोबर पहावयास मिळतात. कपाटांवरच्या पाट्या व वर्गवारीचा सलग तक्ता यांच्या दर्शनानें वाचकांना वर्गीकरण पद्धती आणि तीनुसार केलेली पुस्तकांची स्थानव्यवस्था यांची माहिती विनायासानें निदान अल्पायासाने होत जाते. पुण्यांतच महाराष्ट्र औद्योगिक वस्तु संग्रहालय मंडईत माडीवर आहे. तेथील विभागांच्या दर्शक अशा विविध पाट्या ठळकपणें नजरेंत भरतात. अग्निनिवारक दगड (म्हणजे अस्बेस्टॉस), आगपेट्या, कागद, कांच, ग्रामोद्योग, तेलें, लोखंड, रांध्याच्या वस्तु शेतीचे धंध-व्यधारे, स्टेनलेस असे विविध विभाग पाट्यांमुळेंच लगेच आपोआप समजतात. ग्रंथालयांतहि पाट्यांचा असाच उपयोग होईल. मात्र एक गोष्ट लक्षांत घेणें जरूर आहे. वाचकांपैकीं क्वचित् कोणाचे ठायीं आढळणारा हाताळपणा भविष्यकाळीं जेव्हां कमी होईल तेव्हांच त्यांस कपाटांजवळ जाऊं देऊन पुस्तकें स्वतः पहाण्याची, काढण्याची, ठेवण्याची मोकळीक द्यावी. तसें होईपर्यंत क्वचित् आढळणाऱ्या आणि निश्चित उपद्रव करणाऱ्या वाचकांची हाताळपणाची खोड घालविण्याचा व वाचकांना ग्रंथालयाची गोडी लावण्याचा, ग्रंथालयाविषयीं आस्था नि आपुलकी निर्माण करण्याचा, ग्रंथालयाचें कांहीं नुकसान होणें म्हणजे आपलेंच नुकसान होणें ही भावना आणण्याचा व सदैव जागृत ठेवण्याचा आणि त्याकरतांच ग्रंथालयाचे नियम व शिस्त त्यांच्या अंगीं तेच बाणून घेतील याचा, दृढ प्रयत्न केला पाहिजे. आगळीक न करणारे वाचक हळूहळू निश्चितपणे संख्येने वाढत आहेत. त्यांना विषयदर्शक पाट्यांसारख्या साधनांचा फायदा नेहमी मिळावा.

**(३) ग्रंथालयाची सूची व तीमधील बहुविध उल्लेख** — पुस्तकांची स्मृतिसाहाय्यक संकेतांनुसार स्थानवारी, स्थानवारीचा सलग तक्ता व त्या त्या वर्गांकडे म्हणजे विषयांकडे नेणाऱ्या वाङ्मयाचें काम करणाऱ्या पाट्या हें सर्व केल्यावरहि त्यांहून अधिक म्हणजे पुस्तकांच्या अंतरंगांतील एकूण अंगोपांगे दाखविण्याकरतां बहुविध उल्लेखनीय तपशिलांची संपूर्ण नोंद केलेलीं सूचीपत्रें हाताशीं तयार करून ठेवलीं पाहिजेत. एकच लेखक असेल तर त्याचा, एकाहून जास्त लेखक असेल तर प्रत्येक सहलेखकाचा, संपादकाचा, संग्राहकाचा, संशोधकाचा, अनु-

वादकाचा, टीकालेखकाचा, टिप्पणी लेखकाचा, चित्रकाराचा, मालसंपादकाचा, ग्रंथनामाचा, संयुक्त म्हणजे-अनेक विषय पुस्तक असेल तर त्यांतील प्रत्येक पृथक् विषय विभागाचा, लेखकाच्या टोपण नांवाचा, अन्य ग्रंथनाम असेल तर त्याचा असे सर्वविध उल्लेख सूचीमध्यें प्रत्येकासाठीं स्वतंत्र सूचीपत्रें तयार करून समाविष्ट करावे लागतील.

**(४) ग्रंथालयीन माहिती देणारा साहाय्यक** — वरील तीनहि सोई अपुऱ्या आहेत असाहि अनुभव हटकून येतो. केव्हां एखादा वाचक अक्षरशः तीरासारखा ग्रंथालयांत शिरतो. अर्थात् त्याला वेळ फारच थोडा आहे आणि त्याला हवी असलेली माहिती अतिशय निकडीनें हवी आहे हें ग्रंथपालाच्या लगेच ध्यानांत येतें. अशा वेळीं ग्रंथपालानें आवर्जून पुढें होऊन तोंडांच क्षणा दोन क्षणांतच त्या वाचकाभ्यासकाला हवी असलेली माहिती काढून द्यावी लागते. त्याला स्वतःला ती माहिती शोधावयास नि पहावयासहि वेळ नसतो. ती माहिती महत्त्वाच्या कामाकरता हवी असली तरीहि ती मिळविण्यासाठीं जे श्रम करावे लागतील त्या श्रमांचा त्या माहितीच्या उपयोगाच्या क्षणानंतर काडीचाहि उपयोग नसल्यास ते करण्यांत वेळ दवडावा असें त्या वाचकाला वाटत नसतें आणि ती माहिती आयती तयार अशी मिळावी अपेक्षा करूनच तो येतो. अशा वेळीं तशी माहिती देणाऱ्या सहाय्यकाची आवश्यकता सिद्ध व सार्थ होते. असंख्य ग्रंथ आजवर तयार झालेले आहेत. त्यामधील विशिष्ट माहिती कांहीं ना कांहीं गरज भागविण्यापुरती असंख्य जनांना लागते. प्रत्येकाला हे सर्व ग्रंथ वाचून त्यांतील माहिती ध्यानांत धरणें अशक्य आहे. प्रत्येकजण इतकें सगळें वाचूहि शकणार नाही. प्रत्येकाला सर्वच्या सर्व वाचनीयेंहि मिळणार नाहींत. आणि केव्हां तरी अनेकविध माहिती हवी असें अनेकांस वाटणार. म्हणून ही माहिती असणारा व ती अचूकपणें देणारा कोणीतरी लोकांच्या वाचनाची सोय करणाऱ्या ग्रंथालयांमध्यें असणें आवश्यक आहे. ज्या ज्या ठिकाणीं लोकोपयोगासाठीं ग्रंथ ठेवले जातात त्या त्या ठिकाणीं ही सर्व माहिती करून घेतलेला नि करून घेणारा व देणारा ग्रंथालय सहाय्यक नेमण्याची पद्धति असली पाहिजे. ग्रंथालयात असें साह्य दिलें जातें हें प्रत्येक वाचकाभ्यासकाला माहिती होण्याकरता, त्याचें पाऊल प्रवेशद्वारात पडतांच अगदी लगेच व सहज दृष्टीसमोर येईल अशी **'न संकोचता माहिती मागा'** या किंवा अशा मजकुराची पाटी अवश्य लावावी. अशी पाटी पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजच्या व नूतन मराठी प्रशाळेच्या ग्रंथालयांत दिसते. तिचा फार उपयोग झाला आहे व होतो.

**(५) ग्रंथालयकार्याची प्रसिद्धी** — दरमहाच्या एकदर कामाची माहिती स्थानिक वृत्तपत्रांतून द्यावी. "सबंध महिन्यांत इतके वाचक येऊन गेले. त्यामध्यें

प्रौढ इतके, मुलें इतकीं, स्त्रिया इतक्या अशी माहिती पृथक्पणें द्यावी. मागील महिन्यापेक्षां अमूक फरक पडला आहे, कोणा वाचकाकडून केव्हां ग्रंथालयाची कांहीं आगळीक झाली तर तो प्रसंग साधून नियम व शिस्त यांच्या पालनाबाबत ग्रंथालयानें हृद्गत अमूक आहे, ग्रंथालयांत अमूक विशेष खरेदी झाली, अमूक विविध ज्ञानाची माहिती सूचनाफळ्यावर लावली, अमूक ज्ञानविकास कार्यक्रम झाला इत्यादि तपशील वृत्तपत्रामध्यें प्रसिद्ध करावा. वर्षभरानें एकंदर आढावा घेऊन त्याला मासिकामधून प्रसिद्धी द्यावी. अशा प्रसिद्धीनें सामान्य जनांचा बुजरेपणा मावळेल. शिक्षितांचा दृष्टिकोन निवळेल. आणि क्रमानें जास्त संख्येनें जनता तेथें वळेल. त्या सर्वांस ग्रंथालयांतील ज्ञानसाधनांचा फायदा सर्वांस अधिकाधिक प्रमाणांत घ्यावासें वाटूं लागेल. 'ज्ञानविकास कार्यक्रम' म्हणजे अधिकाधिक वाचकाभ्यासकांनीं ग्रंथालयाचा लाभ घेण्यासाठी ग्रंथालयाकडे वळूं लागावें या दृष्टीनें त्यांनू ठेवावयाचे अभ्यासमंडळ, वादविवाद मंडळ, निबंधस्पर्धा, स्मृतिदिन, संमेलन इत्यादि कार्यक्रम.

**(६) देवघेवींत साह्यकर असणारीं ओळखपत्रें इत्यादि** — घरच्या देवघेवींत म्हणजे ग्रंथालयाबाहेर नेण्याच्या वाचनीयांची नोंद व संख्या सुरळितपणें नेमकी रहावी व या कामांत वेळाचा अपव्यय न व्हावा या दृष्टीनें प्रत्येक वाचकाचें ओळखपत्र असावें. त्याचप्रमाणें घरीं नेण्याच्या एक एक पुस्तकासाठीहि वाचकांजवळ तसें संख्या दाखवणारें पत्र असावें. यामुळें देवघेवीच्या एकसाची असणाऱ्या कामांत जास्तींत जास्त बिनचूकपणा व नेमकेपणा साधतो. परंतु आपल्या इकडे देवघेवीची ही पद्धति, देवघेव अजून फार वाढलेली नसल्यामुळें अजून सर्वांस आलेली नाहीं.

**(७) मुक्तद्वार कपाटें** — वाचकाभ्यासकांना ग्रंथाच्या जवळ आणणें किंवहुना वाचनाभ्यासासाठी ग्रंथालयांत आलेल्या वाचकाभ्यासकांच्या जवळ ग्रंथ नेणें हें ग्रंथपालनाचें परमोद्दिष्ट गणलें जातें. प्रत्येक वाचकाभ्यासकाला विशिष्ट प्रकारच्या वाचनाची आवड किंवा गरज असते. याप्रमाणेंच प्रत्येक विषयाच्या पुस्तकांचे विशिष्ट वाचक असतात. यासाठीच विषयवार स्थानव्यवस्थेनें सर्व वाचनीयें ठेवावीं लागतात. त्या त्या विषयाच्या वाचकांना एकदम त्यांच्या वाचनविषयाच्या सन्निध नेऊन त्या विषयाचा सर्वच्यासर्व ग्रंथसंग्रह त्यांच्यासमोर उभा करावा लागतो. त्या त्या विभागांत वाचकांनीं मुक्तसंचार करावा व हवें तें त्यांचें वाचनीय त्यांनीं हातांत घेऊन पहावें अशी व्यवस्था बहुतेक सर्व पश्चिमी ग्रंथालयांमध्यें असते. वाचनीयें जेथें ठेवलेलीं असतील तेथें फशाचीहि आडकाठी वाचकांना असूं नये असें त्या प्रदेशामधील ग्रंथालयचालकांचें मत नि प्रतिपादन आहे. याचाच अर्थ कपाटें मुक्तद्वार म्हणजे आल्या गेल्या कोणालाही उघडी असलीं

पाहिजेत. हें तत्त्व समृद्ध देशांमध्यें पाळलेलें आहे आणि त्याचा सतत प्रचार तिकडे होतो. आपल्या इकडेहि ज्ञानोत्सुक वाचकाभ्यासक आणि ज्ञानदान करणारीं वाचनीयें यांच्यामध्ये कसलेंहि दार आड येऊं नये असें तत्त्व जपण्यास हरकत नाही. पण या तत्त्वाच्या मूलस्थानामधील समृद्धि आपल्या इकडे आली, सरकारनें ग्रंथालयांबाबत सर्व अनुकूलता आणली, ग्रंथालयसंचालकांना वाचनाच्या प्रचंड प्रमाणामुळें ग्रंथ गहाळ होणें ही क्षुल्लक नि क्षम्य घटना ठरवितां आली कीं मगच आपल्या येथें हें तत्त्व व्यवहारांत आणतां येईल. ग्रंथालयांत वाचनाभ्यासासाठी येणाऱ्या वाचकांना कमींत कमी वेळांत व सर्वांस कमींतकमी निर्बंधानें पुस्तकें मिळण्यासाठी कपाटें मुक्तद्वार असावीं व तेथें मुक्तप्रवेश असावा ही समृद्ध देशांमधील एक आधुनिक रीत आहे व ती फलदायीहि आहे या दृष्टीनें येथें उल्लेखिली आहे.

**ग्रंथालयाचें कर्तव्य** — 'ग्रंथ उपयोगासाठीं आहेत' ह्या विचाराची सार्थता पटल्यापासून जिज्ञासूंच्या पृच्छेचे निरसन होण्याकामीं ग्रंथालयें झटूं लागली आहेत. त्याकरतांच ग्रंथालयांत गोळा होत जाणाऱ्या सर्व वाचनीयांचीं व ज्ञान साधनांची वर उल्लेखिलेल्या तंत्रबद्ध गोष्टींच्या साह्यानें सिद्धता ठेवण्याचा प्रयत्न केला जातो. ग्रंथालयांत गोळा झालेलें व होत असणारें एकुण ज्ञान अफाट आहे. आपण बालपणापासून परिचय, निरीक्षण, अनुभव व मनन या पायऱ्यांनीं असंख्य ज्ञानकण माहीत करून घेतो व स्मरणांत धरण्याचा यत्न करतो. पण आपली स्मृति मर्यादित असते. अनेक गोष्टी आपल्या स्मरणांतून पटापट नाहीशा होतात. अवलोकन, अनुभव, गुरुमुख, मनन यांचेद्वारें मिळविलेलें आपलें एकूण ज्ञान कोणत्या ना कोणत्या क्षणीं, कोणत्या ना कोणत्या बाबतींत अपुरें असल्याची जाणीव आपणास होते. आणि पुढें उभ्या राहिलेल्या पृच्छांचीं उत्तरें कोठेंशी मिळतील याचा तपास घ्यावा लागतो. ग्रंथालयामध्यें तीं उत्तरें, हवी ती ती माहिती मिळते. तेथें ती सूत्रमय रीतीनें व्यवस्थित ठेवली जाते. तें सूत्र कोणतें हेंहि उकलून सांगितलें जातें. या करतांच अवश्य ती सर्व तयारी तेथें नित्य केली जाते. लोकोपयोगी ग्रंथालयाचें तें कर्तव्यच आहे.

## ग्रंथालयीन साह्य

**ग्रंथालयीन साह्याच्या कल्पनेचा विकास** — सर्व जिज्ञासूंना हवी असणारी माहिती ग्रंथालयांनीं दिली पाहिजे अशी एक जबाबदारी प्रथम सार्वजनिक ग्रंथालयांमध्यें वाढूं लागली. या कामाला आरंभीं 'वाचकांना साह्य' (म्हणजे aid to readers) असें संबोधलें गेलें. प्रथम प्रथम वाचकानें मागितलेलें एक किंवा जास्त पुस्तकें त्याचेपुढें ठेवली जात. त्यानंतर त्या विषयावरील ग्रंथपालाम

माहिती असलेलीं आणखीहि पुस्तकें ठेवलीं जाऊं लागलीं. आणि हळूहळू कालक्रमामध्यें या कामाची व्याप्ती स्वयंस्फूर्तपणें ग्रंथपालांनीं वाढविली. ग्रंथालयांत दूरभाषक आला नि त्याद्वारें बहुविध पृच्छांचें निरसन क्षणार्धांत होऊं लागलें. दूर गांवाहून पत्राद्वारें विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरेंहि दिलीं जाऊं लागलीं. आगगाडीच्या वा विमानांच्या स्थानकावर जसें माहिती केंद्र ठेवलेलें असतें तसेंच मोठ्या ग्रंथालयांमध्येंहि या कामामुळें वेगळें माहिती केंद्र दिसूं लागले. केवळ मोठ्या सार्वजनिक ग्रंथालयांमध्येंच हें काम होऊं लागलें असें नाहीं. क्रमानें विद्यालयांच्या, व्यावसायिक संस्थांच्या, संशोधन संस्थांच्या ग्रंथालयांमध्येंहि हें काम वाढत्या प्रमाणांत होऊं लागलें. प्रथमारंभींचा 'वाचकांना साह्य' हा शब्द कालक्रमांत बदलला व या कामास '**संदर्भसाह्य**' असें संबोधन प्राप्त झालें. ग्रंथालयसेवेचें परमोद्दिष्ट या संबोधनांत एकवटलें आहे.

**संदर्भसाह्य म्हणजे काय ?** — अनेकांना हा विषय नवीन वाटतो. परंतु वस्तुस्थिति केवळ तशी नाहीं. अमूक गोष्टी म्हणजे हा विषय ही स्पष्ट कल्पना नसल्यामुळें तशी कल्पना होते. रविवारच्या सकाळमध्यें रविवारचा ताजा पदार्थ सांगितलेला असतो. पदार्थ फोडणी घालून तयार करावयाचा असेल तर, थोडें अतिशयोक्तीनें बोलावयाचें म्हणजे, तेल किती अंशांपर्यंत ऊष्ण करावयाचें किंवा मोहरीचे दाणे किती टाकावयाचे एवढा सूक्ष्म तपशीलहि त्यांत दिसेल. घराघरातल्या सुगरणीला सांगितल्यास तो एकच पदार्थ काय, तसे अनेक पदार्थ ती करूं शकते. पण हें अंशतोळ्याचें नि कणदाण्याचें मोजमाप ती देत बसणार नाहीं. आणि तसलें रुचिर नि सुचिर नावहि देतांना ती आढळणार नाहीं. परंतु आपणास तसा पदार्थ मिळाल्यावांचून रहाणार नाहीं. संदर्भसाह्य ह्या विषयासंबंधीं हीच स्थिति आहे. आपणापैकीं बहुतेकांना अनेक प्रकारचा 'संदर्भ' माहिती असतो. पण त्यासंबंधींची अमूक गोष्ट म्हणजे संदर्भसाह्य हें माहिती नसतें. प्रयोगानें हें तंत्र शिकावयाचें असतें. आपणा प्रत्येकाच्या ज्ञानांत व्यक्तीपरत्वें चौरसपणा खात्रीनें असतो. त्या चौरसपणाच्या प्रमाणांत प्रत्येकजण दुसऱ्यास हवी असेल तेव्हां माहिती देत असतो. ग्रंथपालनवर्गांत हा विषय शिकावयास येणाऱ्या अनेक अध्यापकांनीं त्या वर्गांत येईपर्यंत कितीतरी माहिती, संदर्भ या सदरांत पडणारी, हाताळलेली असते. असंख्य अध्यापकांनीं आपल्या विद्यालयांतील अध्यापकांना अशी माहिती अनेक वेळां मुद्दाम काढून पुरविलेली असते. दुसऱ्या एका संदर्भांत संदर्भ हा शब्द गेल्या पिढीपर्यंतच्या व आजच्याहि सर्व विद्यार्थ्यांना म्हणजेच अध्यापकांना चांगला माहीत झालेला आहे. विद्यालयीन परीक्षांच्या प्रश्नपत्रिकांमध्यें 'संदर्भासहित स्पष्ट करा' हा कायम स्वरूपाचा प्रश्न असतो. अर्थात् अध्यापकांना काय किंवा अध्यापकांना काय मुद्दाम संदर्भ शोधून काढण्याची संधि गेल्या पिढीपावेतों निश्चित,

हेंच काय, चालू अध्यायकांच्या पिढी पावेतोंहि फारशी उपलब्ध असल्याचें दिसून आलेलें नाहीं. कारण तशीं ग्रंथालयें अजून तरी कोठें आहेत? कपाटांनीं आडोसलेल्या एखाद्या जागेंतच तेथील 'ग्रंथालय' या पाटीमुळेंच ग्रंथालय दिसतें. अशा ग्रंथालयामध्यें कोठला आला आहे शोध नि कोठून मिळणार आहे संदर्भ! सामान्य जीवनांतलेंहि उदाहरण घेतां येईल. कुणीहि एखादी माहिती विचारली नि ती आपल्याला माहिती नसली तर कोणातरी माहितगारांस विचारून किंवा पुस्तकांत पाहून आपण ती देतो. हा संदर्भशोध व दिलेलें साह्य हें संदर्भसाह्यच होय. पण शास्त्र या दृष्टीनें याविषयीं अधिक माहिती मिळविली पाहिजे. ग्रंथपालन या नव्यानें रुजत असलेल्या शास्त्रांतील *संदर्भसाह्य ही एक महत्त्वाची शाखा आहे* आणि तिची माहिती सिद्धांतस्वरूपात करून घ्यावयाची आहे.

***या शब्दाची व्युत्पत्ति व उद्गम*** — संदर्भ हा संस्कृत शब्द आहे. 'सं' म्हणजे एकत्र व 'दृभ्' म्हणजे जोडणें. मराठींत दाभण हा शब्द आहे. ढोबळपणें जोडण्याचें काम करणारें हत्यार दाभण. यावरुन जोडणारा, जें जोडावयाचें तें, ज्याचा उपयोग करुन जोडावयाचें तें साधन अशा सर्व गोष्टींचा बोध संदर्भ शब्दामुळें होतो. ही ढोबळ कल्पना ध्यानांत घेऊन पुढील विविध व्याख्यांचा विचार पाहूं या.

(१) घरच्या देवघेवीसाठीं जीं पुस्तकें ग्रंथालयांत असतात तीं सोडून जी पुस्तकें केवळ ग्रंथालयांतच उपयोगिण्यासाठीं ठेवलेलीं असतात त्यांचा उपयोग व्हावा म्हणून ग्रंथपाल जें काम करतो तें काम म्हणजे सदर्भसाह्य.

(२) कोणत्याहि संशोधकास वा अभ्यासकास त्याच्या विषयात ग्रंथपालानें केलेलें साह्य म्हणजे संदर्भसाह्य.

(३) ग्रंथालयातील सामग्रीचा उपयोग करण्याकरतां वाचकाभ्यासकाना माहिती व मदत देणारा ग्रंथालयाचा एक भाग म्हणजे संदर्भ विभाग.

(४) कोणत्याही संशोधकाच्या वा अभ्यासकाच्या संशोधनाभ्यासात माहिती व मदत देण्याचें काम करणारा ग्रंथालयव्यवस्थेतील एक भाग म्हणजे संदर्भ विभाग.

(५) संशोधनाभ्यासाकामीं ग्रंथालयांतील एकूण संग्रहाची संपूर्ण माहिती देण्यासाठीं ग्रंथालयाची सर्व माहिती असणाऱ्या कोणीहि दिलेलें व्यक्तिगत साह्य म्हणजे संदर्भसाह्य.

यांपैकीं कोणतीच व्याख्या निर्दोष नि चांगल नाहीं. पण त्यांतून संदर्भसाह्याचा हेतू स्पष्ट होत आहे. 'संदर्भसाह्य म्हणजे जिज्ञासा व ज्ञान यांची सांगड घालणें' किंवा 'ज्ञानार्थी जिज्ञासूचें समाधान करण्यासाठीं त्याला आवश्यक तीं

ज्ञानसाधनें उपलब्ध करून देणें ' असें म्हणता येईल. कोणत्याही विषयाची वा मद्याची माहिती मागण्याकरता येणाऱ्या प्रत्येकास सर्व माहिती नि साह्य सुलभतेनें व तत्परतेनें मिळालें पाहिजे. वाचकांना उपयुक्त होणारी वाचनीयें निवडून त्यांची यथापेक्ष स्थानव्यवस्था करणें, त्यांची संपूर्ण सूची तयार करून ठेवणें हें कामहि प्रत्यक्ष त्या पुस्तकादींची माहिती देण्याइतकेंच महत्त्वाचें आहे. वाचकाभ्यासकांना माहिती मिळण्यासाठीं जें जें काम ग्रंथालयानें करावयाचें तें तें संदर्भसाह्य ह्या संज्ञेखालीं येईल. 'वाचकांना साह्य' ह्या मूळ शब्दांत प्रथमतः एकोणिसाव्या शतकाच्या मध्यानंतर सन १८६१ मध्यें बदल केला गेला व 'संदर्भ साह्य' हा शब्द सुरू झाला. त्याच्या सुबोधतेसाठीं झालेले विविध प्रयत्न म्हणजे वर दिलेल्या व्याख्या.

**जबाबदार संदर्भ साहाय्यक** — ग्रंथालयीन सेवेबाबतच्या सर्व कल्पना कालक्रमांत पालटत आलेल्या आढळतात. वाचकांनीं मागितलेलेंच पुस्तक पुढें ठेवणें येथपासून वाचकांस हव्या असलेल्या गोष्टीची माहिती शोधशोधून त्यांच्या हातीं देणें, ग्रंथालयांत नसेल तर अन्य ग्रंथालयांतूनहि मिळवून देणें येथपावेतों या सेवेंत आमूलाग्र फरक पडला आहे. अर्थात् अशी सर्व माहिती शोधून काढणारा, मिळवून आणणारा, ध्यानांत धरणारा जो सहाय्यक म्हणजे संदर्भसाह्याचें काम करणारा ग्रंथपाल असेल तो चांगला शिक्षित असला पाहिजे, याविषयींच्या चांगल्या शिक्षणामुळे चांगल्या मिळकतीचाहि तो असला पाहिजे हा त्या नेमणुकीसंबंधांत बदलत आलेला दृष्टिकोन आहे. हें काम करण्यास सामान्य दर्जाचा सेवक समर्थ होणार नाहीं ही खात्री हळू हळू पटत चालली आहे. मोठ्या ग्रंथालयामध्ये केवळ याच कामासाठीं वेगळा सहाय्यक नेमण्याची प्रथाच पडली आहे, आणि यापुढे सर्वच ग्रंथालयांमधून या स्वरूपाचें काम सुरू होणार आहे, तें वाढतच जाणार आहे. यासाठी ग्रंथपालांना आपल्या मूळ शिक्षणाचा दर्जा दृढ करावा लागणार आहे. नाहींतर संदर्भसाह्याचें काम करतां येणें जुळणार नाहीं. मुळांत त्याचे ठायी बहुविध, चौफेर माहिती असली पाहिजे व कोणत्याहि क्षणीं ती स्मरणांत आणतां आली पाहिजे. तरच संदर्भसाह्याचे काम यशस्वीपणें पुरें होईल.

**संदर्भार्थ येणारे प्रश्न** — पुढल्यासारखे अनेकविध प्रश्न अनेकजण अगणित वेळा ग्रंथालयांत घेऊन येतात. आणि त्यांचें उत्तर शोधून वा मिळवून त्यांस कमींत कमी वेळांत द्यावें लागतें.

(१) महात्माजींचा जन्म कोणत्या सालीं झाला ?
(२) 'गीतांजली' चे कर्ते कोण ? मराठी अनुवादक कोण ?
(३) पुण्यांत ट्रामगाडी आहे कीं नाहीं ?
(४) सह्रदेव, भाडळी, लीलावती हीं कोण ?
(५) 'विवेकामृत' हा ग्रंथ कुणाचा आहे ?

(६) घोडा हा प्राणी सस्तन आहे कीं कसें ?
(७) 'मारुतीची शेपूट रावणाच्या कानांत' ही गोष्ट
(८) 'स्तुपातक न्याय' म्हणजे काय ?
(९) 'आर्य समाज' कोठें आहे ?
(१०) काजळ कसें करतात ?
(११) पी. जी. वुडहाउस यांचें कार्य कोणतें ?
(१२) प्राणायाम कसा करावा ?
(१३) 'शशिकांत पुनर्वसु' यांचें खरें नाव कोणतें ?
(१४) झोप या विषयावरील भाषणासाठी मुद्दे.
(१५) 'पेरू' हें देशाचें नांव आहे का ? कोठे आहे तो देश ?
(१६) पुण्यांत ओंकारेश्वराजवळून वहाणारी नदी मुळा कीं मुठा ?
(१७) अमृत मासिकाचे संपादक कोण व वर्गणी किती ?
(१८) मुंबईकडे पुण्याहून सकाळीं ७-३० ला निघणाऱ्या गाडीला तिसरा वर्ग आहे कीं नाहीं ?

असे नानाविध प्रश्न ग्रंथपाल आपल्या खुर्चीत जरा रेलून स्वस्थ होत असेल तोंच त्याचेपुढें येतात आणि त्याविषयींची शक्य तेवढी नेमकी माहिती मिळवून शक्य तितक्या कमी वेळांत पृच्छकाचें समाधान होण्याइतकी उत्तरें द्यावीं लागतात. अशी माहिती शोधशोधून काढणें व ती पृच्छकांस देणें याचेंच नांव संदर्भसाह्य: असल्या असंख्य प्रश्नांचीं उत्तरें अनेकांनीं आजपर्यंत मागितलीं असतील. अशांपैकीं अनेक प्रश्न आपणापैकीं अनेकांस आजवरच्या आयुष्यांत केव्हां ना केव्हां पडले असतील. आणि असेंहि झालें असेल कीं एखाद्या प्रश्नाचें तरी उत्तर सांपडलें नसेल व ती पृच्छा तशीच विराम पावली असेल. ग्रंथालयांतील संदर्भसाह्य म्हणजे अशा पृच्छेचें नेमकें उत्तर मिळवणें व तें पृच्छकाला हवें असलेल्या क्षणीं तत्परतेनें देणें. मग त्या कामीं कितीहि ग्रंथ चाळावे लागोत, कितीहि जाणकारांना भेटावें लागो, कितीहि पत्रव्यवहार करावा लागो. ग्रंथालयामध्यें किती प्रकारच्या पृच्छा येतात, त्यांपैकीं सामान्य म्हणजे सहज पुऱ्या करण्याजोग्या कोणत्या, ज्यांचें उत्तर मुद्दाम शोध करून मिळवून द्यावें लागतें अशा कोणत्या, सहज देण्यायोग्य उत्तरें कोणत्या पुस्तकांमध्यें चटकन सापडतात, मुद्दाम शोध करून जीं उत्तरें मिळवावीं लागतात तीं कोणत्या पुस्तकामध्यें सापडतात या सर्व गोष्टींचें आडाखे ग्रंथपालाला आपणापाशीं गोळा करावे लागतात. येणाऱ्या पृच्छकांची गरज, वय, बौद्धिक पातळी इत्यादींचाहि विचार करावा लागतो. 'ग्रंथालयांत योग्य पृच्छांचीं उत्तरें मागावीं नि मागितलीं कीं मिळतील' याविषयीं विविध वाचकांचें ठायीं जरा विश्वास निर्माण केला पाहिजे तरीच उटसूट क्षुल्लक

पृच्छांनीं ग्रंथपालाचा वेळ मोडूं नये ही दिस्तहि त्यांस लागली पाहिजे. वाचकाभ्यासकांचा अभ्यास, ज्ञानपिपासा याला पोषक असें जें जें असेल तें तें ग्रंथालयांत आणण्याचा प्रयत्न असला पाहिजे. जी माहिती द्यावयाची तिच्या सार्थतेबद्दल प्रत्येकास खात्री वाटेल अशा रीतीनें म्हणजे त्या माहितीच्या अविकृततेनें व स्नेही स्नेह्याला देतो त्या साहाय्यशीलतेनें ग्रंथपालानें आपलें संदर्भसाह्याचें काम केलें पाहिजे.

## संदर्भसाह्याची व्याप्ती

**ग्रंथालय परिचय** — कोणीहि वाचकाभ्यासक कांहीं माहितीसाठीं ग्रंथालयांत आला कीं प्रथम त्याला तेथें हव्या असणाऱ्या माहितीचें स्वरुप समजून घ्यावें लागतें. म्हणजेच ग्रंथालयामधील एकूण सामग्रींत त्या पृच्छेचें उत्तर कोणत्या वाचनीयांमध्यें मिळेल याचा मनांतल्या मनांत वर्गवारी करुन विचार ठरवला पाहिजे. या प्रमाणेंच त्या पृच्छकाची गरज, वय, बौद्धिक पातळी यांचाही अंदाज घेऊन त्याचीहि वर्गवारी मनांत केली पाहिजे. हें करण्यास ग्रंथपालाला अवसर मिळावा लागतो. पृच्छा येतांच तिचें व तिच्या पृच्छकाचें कांहीं वेळांत पृथक्करण करतां येतें. या वेळांतच ग्रंथालयाचाहि कांहीं परिचय त्यास करुन देता येतो. अर्थात् हा परिचयसमय वेगवेगळ्या तऱ्हेनें साधता येतो. ग्रंथालयाच्या प्रकाराप्रमाणेंहि त्यांचें स्वरुप वेगळें असतें. सर्वसामान्य परिचयाचें स्वरूप सर्व प्रकारच्या ग्रंथालयांमध्यें सारखेंच असतें. पण ग्रंथालयांचें स्वरूप त्यांच्या कार्याप्रमाणें वेगवेगळें होतें. प्रशालेय ग्रंथालयें, महाविद्यालयीन ग्रंथालयें, संशोधन संस्थांचीं ग्रंथालयें, सार्वजनिक ग्रंथालयें, व्यावसायिक ग्रंथालयें असें त्या त्या संस्थेच्या कार्याप्रमाणें ग्रंथालयांचें स्वरूप वेगळें होतें व या प्रत्येक स्थळीं करून घ्यावयाच्या नि करून द्यावयाच्या परिचयाचें स्वरूपहि अर्थात् बदलतें.

**नव्यानें येणारांस द्यावयाची माहिती** — कार्यक्षम आणि लोकप्रिय ठरलेल्या ग्रंथालयामध्यें येणाऱ्यांची संख्या मर्यादित राहूं शकत नाहीं. तेथें अनेक प्रकारचें साह्य मिळतें, इतर्नी तीं वाचनीयें सुव्यवस्थित ठेवलेलीं मिळतात, बारीकशीहि माहिती मिळवून दिली जाते, वक्तृत्व वा लेखनस्पर्धेतील प्रबंधरचनेंत आवर्जून साह्य देण्यांत येते आणि हा असंख्यविध प्रकारचें साह्य देतांना केवळ साह्यशीलताच दिसून येते. अशी जसजशी अधिकाधिक जाणीव वाचकाभ्यासकांच्या ठायीं येत जाते तसतशी ग्रंथालयाकडे वळणारांची संख्या वाढत जाते. या नव्यानें येत असणारांना ग्रंथालयामधील वेगवेगळे विभाग, नियम, संग्रहाची विविधता, वर्गीकरणाची — सूचीची — देवघेवीची पद्धति, ज्ञानविकासाचे विविध उपक्रम, वाचकांना मिळणारें एकूण विविध साह्य व तें देण्यासाठीं असलेले माहाय्यक इत्यादींची माहिती आपोआप होणार नाहीं. कालक्रमांत ती होईल असें म्हणणेंहि ठीक नाहीं. ग्रंथपालानेंच पुढें

होऊन अगदीं मित्रत्वाच्या नात्यानें सर्व माहिती करून देणें श्रेयस्कर आहे. मोठ्या ग्रंथालयांमध्यें ह्या चौकशी-माहितीचा वेगळा विभागच ठेवला जातो. परिचयाचें काम करणाऱ्यानें सर्व नवागतांचें मनःपूर्वक स्वागत करून ग्रंथालयाचे सर्व विभाग, संग्रह, साहाय्यक, तंत्र पद्धति, एकुण कार्य यांची यथायोग्य माहिती नवागतांना दिली पाहिजे. हें काम करीत असतानाच त्या त्या नवागताचीहि माहिती आपोआप मिळवतां येते.

**वाचकांची वर्गवारी** — ग्रंथालयांत सर्व दर्जांचे, विविध बौद्धिक पातळीचे अनेक व्यवसायांचे, वेगवेगळ्या वयांचे वाचकाभ्यासक येत असतात व अनेकविध विषयांची असंख्य प्रकारची माहिती वेगवेगळ्या कारणांसाठी मागत असतात. ग्रंथालयांच्या प्रकारांप्रमाणें तेथले तेथले वाचक विशिष्ट विषयांवरच भर देताना सामान्यतः आढळतात. प्रशाळा व महाविद्यालयें यांच्या ग्रंथालयांमध्यें क्रमिक विषयांसंबंधींच, तसेंच नैमित्तिक चढाओढींस पूरक असणाऱ्या गोष्टींसंबंधींच बहुशः सर्व प्रश्न असतात. विश्वविद्यालयीन व संशोधन संस्थांच्या ग्रंथालयांमध्यें त्या पातळीच्या पृच्छा येतात. व्यावसायिक संस्थांच्या ग्रंथालयांमध्यें त्या त्या व्यवसायाला धरून माहिती मागितली जाते. तर सार्वजनिक ग्रंथालयामध्यें कोणत्या विषयासंबंधीं काय माहिती मागितली जाईल त्याचा नेम नसतो. ह्या सर्व गरजा ध्यानांत घेऊन वेगवेगळ्या ग्रंथालयाचे संग्रह म्हणजे वाचनीयें व अन्य साधनें परिपूर्ण करण्याकडे सतत लक्ष द्यावें लागतें.

**प्रशालेय ग्रंथालय** — प्रशाळेच्या ग्रंथालयांत 'वाचावें का, काय नि कसें' याचा आरंभ होतो. या दृष्टीनें तेथल्या संग्रहाची सजावट झाली पाहिजे. विद्यार्थी मंडळींना सुगम आणि आकर्षक वाटणारे ज्ञानकोश, चरित्रकोश, शब्दकोश, व्यायाम-खेळ-छंद यांचे कोश, विज्ञानें, ललित वाङ्मय, भूगोल व इतिहास यांविषयींचे कोश यांचें प्रमाण मोठें असलें पाहिजे. हे ग्रंथ शक्यतोंवर सुबक चित्रांनीं परिपूर्ण असावे. ही सामुग्री झाली अध्यायकासाठीं. त्यांच्या अध्यापकांसाठींहि वर उल्लेखिल्या सामुग्रीच्या जोडीला शैक्षणिक मानसशास्त्र व अध्यापन यांवरचे कोश ठेवले पाहिजेत. आणि विशेषानें सर्व विद्यार्थी वाचकांना या सर्व सामुग्रीची माहिती दिली गेली पाहिजे. त्यांना हवी असणारी माहिती कशी शोधून काढावी ही माहिती त्यांना वारंवार मिळाली पाहिजे. ग्रंथालयीन वाचनाच्या संवयीचा प्रारंभ येथें होत असतो. हा प्रारंभ हर प्रयत्नानें दृढ हेतूनें केला जावा. अध्यापक मंडळींनाहि बहुविध मार्गदर्शन मिळणें इष्ट व अवश्य आहे. अध्यापनाची तयारी करतांना प्रत्येक पाठाच्या नियत कालक्रमात पाठाच्या अंतर्गत उल्लेखांना अनुलक्षून असणारी अनेक तऱ्हेची माहिती अध्यापकानें जवळ ठेवणें प्रभावकारी

ठरतें. भाषेच्या धड्यांत एखादा पुराणविषयक संदर्भ असतो. इतिहासाच्या धड्यांत एखाद्या स्थळाचें नांव येतें. विज्ञानांतील एखाद्या प्रमेयाचा फक्त निर्देशच दिसतो. भूगोलाच्या पाठांत माहितीच्या ओघांत कोणा अति प्रसिद्ध प्रवाशाचा एखादा उद्‌गार नमूद असतो. या सर्व संदर्भांची साद्यंत माहिती अध्यापकांना असणें अवश्य आहे. वर्षभरांतील क्रमिक अभ्यासानुसार अशा विविध मुद्यांची माहिती सुसूत्रपणे ग्रंथालयाद्वारें अध्यापक आणि अध्यापक या दोहोंपुढें ठेवतां येईल. एकूण शैक्षणिक संस्थांच्या ग्रंथालयांमध्यें यासारखी तत्परता व तयारी सदोदित दिसली पाहिजे.

**सार्वजनिक ग्रंथालय**—शिक्षण संस्थांच्या ग्रंथालयांमध्यें त्या त्या यत्तेच्या पातळींतले वाचक असतात. तेथल्या संदर्भ पृच्छांमधील बहुसंख्य पृच्छा ठराविक असतात. बहुशः त्या क्रमिक अभ्यासविषयकच असतात. पण सार्वजनिक ग्रंथालयांमध्यें याचा कांहीं नेम नाहीं. नवसाक्षरांप्रमाणेंच उच्चशिक्षित तेथें येत असतात. चौकस लहान वयीनांप्रमाणें सेवानिवृत्त धर्मप्रवृत्तहि येतात. कांहीं नवें संसारोपयुक्त शोधीत येणाऱ्या गृहिणींप्रमाणें आपल्या कारखान्यांतील उत्पादनांत नवें कांहीं करणें शक्य आहे का या शोधांत अनेक निरलस उद्यमी येतात. अन्य भाषीय वा परदेशी मंडळीहि येतात. सार्वजनिक ग्रंथालयामध्यें कोणाला, केव्हां, कसली माहिती लागेल याचा अंदाज बांधतां येत नाहीं. पुढीलसारख्या कोणत्याहि विषयाची माहिती सार्वजनिक ग्रंथालयांत मागितली जाईल. (१) भारतांतील राज्यें. (२) शिवरात्र व नवरात्र. (३) मुंबईतील माहीमचा डाकविभागांक. (४) पोलक्याचा अंब्रेला कट. (५) ध्रुवावरील संधिप्रकाश. (६) ओलेती. (७) उपःपान. (८) ए. डी. (९) हिजरी. (१०) डेक्कन क्वीन. (११) हिप्नो. (१२) योगासनें. (१३) कपड्यावरील गंजाचे डाग काढण्याचा उपाय. (१४) केरळ कोकीळ. (१५) राज्यकवि यशवंतांचें जन्मवर्ष. (१६) अशोक वृक्षाच्या फुलण्याचा संकेत. (१७) बी. एजी. चीं क्रमिकें. (१८) इंग्रिड साहेब. (१९) नृत्यकला. (२०) जादूगारचें पहिलें प्रकरण. (२१) सावरकरांवरील पुस्तकें. (२२) पुणें विद्यापीठाचा प्रारंभ. (२३) नागपूरच्या ग्रंथपालन डिप्लोमाचा अभ्यासक्रम. (२४) ग्रंथालयांचे सेवानिवृत्तीचे नियम. (२५) जादूगार रघुवीर यांची माहिती. या सर्व पृच्छांमध्यें अनेक ठिकाणच्या सार्वजनिक ग्रंथालयांमधील बहुविध दर्जाच्या वाचकांना अपेक्षित असलेली माहिती अभिप्रेत आहे. यांतले कांहीं प्रश्न एखाद्या तालुक्याच्या किंवा जिल्ह्याच्या ग्रंथालयांत विचारले जातील. कांहीं मोठ्या शहरांमधील ग्रंथालयांत कोणी विचारतील.

**व्यावसायिक, औद्योगिक व संशोधन संस्था**— या प्रकारच्या ग्रंथालयांमध्यें वाचकांची संख्या अगदी मोजकीच असते पण जे वाचकाभ्यासक येतात त्यांच्यासाठी त्या संस्थेच्या कार्यानुरूप नेमकी माहिती सतत मिळवित व टिपीत रहावें लागतें. त्या त्या व्यवसायाला उपयुक्त असे ज्ञानकोश, सूत्रावल्या,

वाचकांच्या तक्रारी जर व जितपत मार्थ असतील तितपत त्या तक्रारी निवारून तसें केल्याचें त्यांस दाखवत जाणे श्रेयस्कर ठरतें. उकाडा, पाण्याचा थंडगारपणा, प्रकाशाची अपुरी सोय, पंख्यांचा अभाव, विशेष वाचकप्रिय ग्रंथांच्या प्रतींची कमी संख्या अशांसारख्या बाबतीत सुळेल तें करावें. जुळणारें नसेल तर ग्रंथालयाच्या जागेची टंचाई वगैरे त्यांचे पुढें मांडून वस्तुस्थितीबाबत त्यांची सहानुभूति मिळवावी. हाताळांची गैरसवय जावी असा प्रयत्न करावा. पण तो यशस्वी होत नसेल तर त्यांस बंदी करण्याचाहि उपाय योजण्यास हरकत नाहीं. पण सर्वसामान्य वाचक सरळपणानें चालणारेच असतात. ग्रंथपालानें त्यांच्या बुद्धीची व गरजेची पातळी अजमावून त्यांस ग्रंथालयाच्या नियमांची, सोईगैरसोईंची, संग्रहाची, संग्रहामधील उणिवांनी कित्येक वाचनीयांच्या फळव्या नांवांची, अभ्यासपूर्ण ग्रंथांची इत्यादि सर्व माहिती वेळ साधून दिली पाहिजे. अर्थात् या सर्वांसाठीं ग्रंथपाल चांगला बहुश्रुत, नवज्ञान संपादनोत्सुक व संघटक हवा.

## संदर्भ साहित्य

**संदर्भ ग्रंथ**—प्रत्येक प्रकारच्या ग्रंथालयांत अनेकविध पृच्छा घेऊन वाचक येत असतात. त्यांचेकडून कोणत्या प्रकारच्या पृच्छा येतात त्याचे नमुने यापूर्वी दिलेले आहेत. अनेक प्रश्नांचीं उत्तरें वेगवेगळ्या ग्रंथांमध्यें एकत्रित दिलेली आढळतात. असे ग्रंथ सतत हाताळावे, पहावे लागतात. यांना संदर्भ ग्रंथ असें नामाभिधान आहे. संदर्भ ग्रंथ म्हणजे नवीन ज्ञान व सर्वसामान्य माहिती यांची भांडारेंच होत. हे ग्रंथ म्हणजे सहस्रो मुद्रित पानांवरील असंख्यविध माहिती कांहीं एका विषयवारीनें एकाच ग्रंथामध्यें आणून ठेवणारीं लहान प्रमाणांतलीं ग्रंथालयेंच जणूं होत. हे ग्रंथ म्हणजे ज्ञानमंदिराकडे नेणारी जवळची वाटच. पंचज्ञानेंद्रियांच्या साह्यानें अनेकविध ज्ञान आत्मसात होत असतें. त्याप्रमाणेंच आणखी एका गोष्टीच्या साह्यानेंहि अकल्पनीय नि अश्रुतपूर्व अशी माहिती मिळते. रोजच्या सहवासामुळें त्या गोष्टीचें महत्व पंचज्ञानेंद्रियांहूनहि अधिक आहे, निदान कमी खास नाहीं हें लक्षांत येत नाहीं. लेखनाच्या शोधामुळें मानवाची केवढी मोठी सोय झाली आहे! या सोयीच्या नि साह्याच्या अभावीं केवढ्यातरी विचारधनास म्हणजे ज्ञानभांडारास मानव मुकला असता! याचा थोडासाच विचार केला तरी एक गोष्ट ठळकपणें नजरेंत भरेल. लिखित माहितीला म्हणजेच ग्रंथांना, ज्ञान देणारें आणखी एक म्हणजे सहावें इंद्रिय, एक नवें अपूर्व इंद्रिय म्हणून संबोधण्यास मुळींच हरकत नाहीं. या सहाव्या इंद्रियाच्या साह्यानें कल्पना करतां येत नाहीं इतकी अगणित प्रकारची माहिती संग्रहित करतां येते. चिरस्थायी होते. कोणत्याहि समयीं उपयोगी येईल अशी सिद्ध रहाते. लिखितज्ञान आपल्या हातांत ठेवण्याचें साधन म्हणजे ग्रंथ.

त्यांमधला एक विशेष प्रकार म्हणजे संदर्भग्रंथ या संज्ञेनें ओळखलें जाणारे ग्रंथराज व सर्व संदर्भ साधनें.

**ग्रंथनिविष्ट विचारधन** — आपल्याला जें जें माहिती असेल तें तें इतरांस सांगावें, तें इतरांच्या उपयोगी व्हावें असें बहुतेक सर्वांना वाटतें. इतरांस सांगावें असें कांहींना कांहीं प्रत्येकाजवळ असतें; मात्र या बहुतेकांपैकीं अतिशय थोड्यांकडून आलेले अनुभव ग्रंथनिविष्ट केले जातात. या ग्रंथनिविष्ट अनुभवांतून अगणित प्रकारचें ज्ञान व माहिती मिळते. युगानुयुगांतील शहाणपणा या अनुभवांमध्यें असतो आणि संदर्भग्रंथांमध्यें हा शहाणपणा एकत्रित केलेला असल्यानें हे ग्रंथ म्हणजे मानवाच्या शहाणपणाचा जणू काय खजिनाच होय. सामान्य वाचकाला या संदर्भ ग्रंथांची माहिती कमीच असते. रोजच्या जीवनांत हे ग्रंथ किती महत्त्वाचें साह्य देतात याची कल्पनाहि फार थोड्यांनाच असते. या संदर्भग्रंथांचें वाचन सलग करावयाचें नसतें. सर्वसामान्य पुस्तकें अथपासून इतीपर्यंत वाचलीं जातात. कारण त्या वाचनामागचा हेतु मनोरंजन, अभ्यास किंवा संशोधन हा असतो. जेव्हां कांहीं विशिष्ट माहितीचा तुकडा हवासा वाटेल, तेव्हांच संदर्भग्रंथांकडे वळावयाचें असतें. शब्दकोश किंवा ज्ञानकोश कोणीहि पहिल्या पानापासून वाचीत सुटणार नाहीं. एखाद्या विवक्षित शब्दाच्या अर्थाकरतां त्या संबंधांतच आपण शब्दकोश पहातो. आणि एखाद्या शब्दानें ध्वनित होणाऱ्या कल्पनेच्या माहितीसाठी आपण ज्ञानकोशाकडे वळतो. हवी असलेली माहिती चटकन व एका ठराविक क्रमांत सापडावी अशा मांडणीनें संदर्भग्रंथ रचलेले असतात. शब्दकोश, ज्ञानकोश आणि त्याचप्रमाणें व्यवसाय परिचय ग्रंथ ( म्हणजे व्यावसायिक डिरेक्टरी ) हे याचें ठळक उदाहरण होत. सलग वाचनासाठी सामान्यग्रंथ रचले जातात. आणि कोणत्याजरी विशिष्ट क्रमानें संदर्भ ग्रंथ रचण्यांत येतात. अमेरिकन ग्रंथालय संघाच्या ग्रंथपालन परिभाषेंत याची चांगली व्याख्या केलेली आहे. "विशिष्ट शैलीची रचना आणि प्रतिपादन पद्धती यामुळें सलग वाचनासाठीं उपयोगी पडण्यापेक्षां विशिष्ट माहितीचें तुकडे मिळविण्यासाठी उपयोगी पडावा ह्या हेतूने ज्या ग्रंथांची मांडणी केलेली असतें व ज्याचा उपयोग फक्त ग्रंथालयांतच करावयाचें बंधन असतें असा ग्रंथ म्हणजे संदर्भ ग्रंथ होय." अशा ग्रंथामध्यें विशिष्ट माहिती कांहीं विशिष्ट सोयीच्या क्रमामुळें चटकन् शोधता येते. हे ग्रंथालयाबाहेर नेऊं दिले जात नाहींत. अर्थात् घरी नेऊं दिले जात नाहींत ते सगळे संदर्भ ग्रंथ ठरत नाहींत. अनेक अति दुर्मिळ ग्रंथ ग्रंथालयांतच जपून ठेवणे भाग असतें. संदर्भग्रंथांतून कोणत्याहि क्षणी माहिती घ्यावी लागते, त्या त्या वेळीं तो ग्रंथालयांत असलाच पाहिजे म्हणून हें बंधन असतें.

**संदर्भसाहित्याचे प्रकार, आकार व जपणूक** — संदर्भग्रंथाप्रमाणेंच इतर संदर्भोपयोगी साधनांचाहि विचार करावा लागतो. एकूण संदर्भग्रंथ पुढील

प्रमाणें आहेत–ग्रंथसूची, ज्ञानकोश, कालिकें, चरित्रकोश, सांवत्सरिकें, माहितीपुस्तकें ( म्हणजे हँडबुक ), संकीर्णग्रंथ, प्रत्येक विषयाचा इतिहास, शब्दकोश, स्थळवर्णन कोश, व्यवसायपरिचयग्रंथ ( म्हणजे डिरेक्टरी ), मालिकें ( म्हणजे सीरियल्स ), गौरवग्रंथ, सरकारी माहितीपुस्तकें. अशा संदर्भोपयोगी ग्रंथांप्रमाणेंच पुढीलप्रमाणें अनेक साधनेंहि संदर्भकार्यात उपयोगी पडतात–कोष्टकें, मोजपट्टया, नकाशे, आराखडे, दिनदर्शकें, पंचांगें, संस्थांचें वृत्तांत, नियमावल्या, प्रयोगवर्णनें, फोन. विविध संदर्भ-ग्रंथराजांचे व साधनांचे आकार नि प्रकार नानाविध आहेत. त्यांच्या किंमती नव्या एकदोन पैशांपासून शेकडो रुपयांपर्यंत आहेत. त्यांमधील मजकूर एखाद्याच पानाचा किंवा हजारों पानेंहि भरणारा असतो. त्यांतली कांहीं पेटींत ठेवावी लागतील, कांहीं भिंतीवर लटकवावी लागतील, कांहीं चौपाईवर तर कांहीं कपाटांमध्यें आडवी करून ठेवली तरच नीट रहातील. तीं जागेवरून काढतांना व परत जागेवर ठेवतांना दक्षता घ्यावी लागते. त्यात निष्काळजीपणा केल्यास जशी त्यांस इजा होईल तशीच त्यांच्या भारानें वा विस्तारानें ठेवणारा काढणारासहि इजा होण्याचा संभव असतो. वाचकांच्या नीतिमत्तेला तर यांच्यापैकीं अनेक विलक्षण रीतीनीं आव्हान देत असतात. ग्रंथपालांच्या दक्ष न रहाण्यानें व यांच्या आकर्षक कटाक्षानें एखादा वाचक भुलला आणि मग यांपैकीं एखादे अंतर्धान पावलें तर पुनरपि ते हस्तगत न होण्याचा संभव उभा होतो ! ज्या भावनेनें यांच्याकडे वळावें त्यानुसार फळ तीं देतात. 'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।' असेंच जणूं त्यांचें नेहमीचें म्हणणें आहे. हीं आपल्या हाताशीं असतील तर कल्पतरूप्रमाणें मागणी केली जाईल तें देतात. पण कल्पतरूजवळ बसूनहि मन निर्विकार ठेवून बसलें तर जसें कांहींही मिळत नाहीं तसेंच यांच्याजवळहि निर्विकार मनानें हात जोडून स्वस्थ बसल्यास कांहींहि मिळत नाहीं. त्यांची अंतर्गाह्य माहिती कोणत्याहि क्षणीं सुलभपणें हस्तगत होईल अशी सुपरिचित करून ठेवली पाहिजे. त्यांच्या अंतरंगाचें संपूर्ण स्वरूप शोध शोधून माहिती करून घेतलें पाहिजे. तीं जणूं आपणांस आवाहन करीत असतात कीं, " आमचा अखंडित अभ्यास ठेवा, उपयोग करा. ' दिव्यं ददामि ते चक्षुः । ' या आणि ' सोनियाच्या खाणी ' शोधा. " सोनियाच्या खाणी ! होय, अनेक सर्वसामान्य ग्रंथांत ज्या अर्थानें मायेचे अलंकार म्हणतात, मायेची समृद्धी–श्रीमंती ज्या ग्रंथांच्या प्रमाणावरून मोजतात त्याच अर्थानें त्याच मोजमापांच्या प्रमाणानें सर्वमान्य संदर्भ ग्रंथांना साहित्यसृष्टींतल्या ' सोनियाच्या खाणी ' असें गौरविणें युक्त आहे. हें त्यांचें महत्व सर्वांस मान्य होईल. तसें मान्य झालें म्हणजे या सोनियाच्या खाणींची सर्वांनीं सर्व प्रकारची काळजी सर्वकाळ घेतली पाहिजे हें उघड होतें. ' अकाल–मृत्यु–हरणं सर्वव्याधि–विनाशनं ' यापासून त्यांचें रक्षण केलें पाहिजे. त्याविषयीं अनुभवानें शहाणे होऊन दक्ष आणि जागरूक राहिलें पाहिजे.

**यांचा संग ठेवूं सदा**—प्राचीन काळापासूनच्या ज्ञानी जनांनीं भावी पिढ्यासाठीं अगणित प्रकारची माहिती ग्रंथनिविष्ट करून ठेवलेली आहे. प्रत्येक पिढींतल्या ज्ञानी जनांकडून त्यात भरच पडत आली आहे. ग्रंथपालांनीं, विशेषानें सदैव संदर्भ साह्य देण्याचें काम करणारांनी अशा सर्व ग्रंथादिकांचे अखंड परिशीलन करणें व त्याच्या सदैव संगतींत रहाणें आवश्यक आहे. संदर्भ साह्याच्या नियुक्त कार्यांत हे संदर्भ ग्रंथ म्हणजे ग्रंथपालाचे मित्र होत. आपण मित्रांना रोज भेटूं न शकलो, तरी कांहीं दिवसांच्या अंतरानें भेटत असतो. दूरस्थ मित्रांशीं पत्राद्वारें संधान ठेवतो. तसेंच संदर्भ ग्रंथांना नेहमी भेटत असावें. तें जमत नसलें तर विशिष्ट कालावधीनें सूचीपत्राद्वारें संधान राखावें. आज संदर्भ साहित्य कसें उपलब्ध करावें हा प्रश्न नाहीं. असें अनेक तऱ्हांचें साहित्य ग्रंथालयांत येण्यासाठीं थांबलेले आढळते. तें ग्रंथालयांत आणतांना त्याला विशिष्ट मूल्यमापनाच्या कसोट्या लावाव्या लागतात. तरच योग्य निवडीनें उपयुक्त संदर्भ संग्रह जमतो.

## संदर्भ ग्रंथांचें मूल्यमापन

**संदर्भ संग्रह**—ग्रंथालयांत ज्या साधनांचा संदर्भ साह्यासाठीं उपयोग केला जातो त्या साधनसंग्रहाला संदर्भ संग्रह असें संबोधलें जातें. केवळ संदर्भ ग्रंथापुरतीच ही व्याख्या मर्यादित नाहीं. संदर्भ प्रश्नांची उत्तरें शोधतांना जीं जीं पुस्तकें, कालिकें, घाडिकें, अभ्यासयाद्या, चित्रें इत्यादि उपयोगिली जातात तें सर्व म्हणजे संदर्भ संग्रह. हा संग्रह वाचकांच्या सन्निध आणि सर्वसामान्य पुस्तकांकहून वेगळा ठेवला जातो. तो जमवतांना प्रत्येक संदर्भ ग्रंथाचें या साधनाचें यथायोग्य मूल्यमापन करावें लागतें. मूल्यमापन करण्याकामीं कांहीं कसोट्या लावाव्या लागतात. संदर्भ ग्रंथ वापरू लागण्यापूर्वी त्याचा संपूर्ण परिचय करून घेणें अत्यवश्य आहे. त्यामुळें वृथा शोधात वेळ वाया जाणार नाहीं. संदर्भ ग्रंथाची व्याप्ती, साधारणपणा, रचना, प्रतिपादनांतील तपशील व वैशिष्ट्यें यांचें निरीक्षण करणें महत्वाचें आहे. खरेदीच्या वेळीं त्यांचे बाह्यांग तपासणे अवश्य आहे. ज्ञानकोश, चरित्रकोश, शब्दकोश अशा संदर्भ ग्रंथामध्यें चित्रे असणें महत्त्वाचें आहे. तर कांहींचें शेवटीं उल्लेख सूची (म्हणजे इंडेक्स) अत्यावश्यक आहे. आणि सांवत्सरिकें, परिचय ग्रंथ अशा तपशिलाच्या ग्रंथांत चित्रें अनावश्यक होतील. मूल्यमापनाच्या ठळक कसोट्या पुढीलप्रमाणें आहेत.

**व्याप्ती**—ग्रंथाच्या विषयाची मर्यादा कोणती ? प्रदेश आणि काळ यासंबंधीं कोणत्या कल्पना आहेत ? त्याचा हेतु कोणता ? त्यांच्या मर्यादेत सर्व विवेचन आहे का ? याच विषयाच्या अन्य ग्रंथापेक्षां यांत एखादें वैशिष्ट्य आहे कां, सर्व माहिती अद्ययावत् आहे कीं कसें ? शेवटीं जरूर ती अभ्याससूची व उल्लेख सूची ( म्हणजे

ग्रिब्लिऑग्रफी व इंडेक्स ) देऊन ग्रंथ परिपूर्ण आहे कां ? या प्रश्नाची उत्तरें ग्रंथनाम, नांवाचे पान ( म्हणजे टायटल पेज ), प्रस्तावना, अनुक्रमणिका, पहिलें किंवा प्रारंभीचीं प्रकरणें व परिशिष्ट ही पाहून बरीचशी मिळतील. त्याचप्रमाणें मुख्य विवेचनाच्या लेखनाचा काळ, प्रसिद्धीवर्ष, मुद्रणकायद्याचें वर्ष, प्रस्तावनेची तारीख यांवरूनहि कांहीं माहिती मिळेल. ग्रंथकर्त्याचा प्रादेशिक, धार्मिक, राजकीय वा वैयक्तिक दृष्टिकोनहि तपासणेंहि अवश्य आहे. संदर्भ देतांना हे दृष्टिकोन ध्यानांत ठेवूनच माहिती देणें इष्ट असतें.

**साधारपणा**—ग्रंथांत असलेलीं विधानें ग्राह्य मानता येतात ना ? हा एक महत्वाचा प्रश्न पहावा लागतो. ह्याचें उत्तर लेखकाचें कार्य नि लौकिक तसेंच प्रकाशकाचें कार्य नि लौकिक यावरून घ्यावें लागतें. ग्रंथ पुनर्मुद्रित असेल तर मूळचें विवेचन जसेंच्या तसेंच आहे कीं, त्यांत सुधारणा केलेली आहे आणि जर केली असेल तर ती कशी आहे हें पहावें लागतें. एखाद्या ग्रंथांत अनेक लेखकांचे लेख एकत्रित केलेले असले तर जरी सर्वांची नसलीं तरी निदान कांहीं मान्यता पावलेल्या लेखकांचीं नांवें दिलेली असतात. त्या नांवामुळें माहितीच्या साधारपणाची म्हणजे भरीवपणाची साक्ष मिळते. आकड्यांचा कोणता तपशील दिलेला असेल तर तो अधिकृत अहवाल वगैरेंमधून आणि स्पष्ट संदर्भ देऊन उद्धृत केलेला आहे किंवा नाहीं हें ध्यानांत घ्यावें लागतें.

**रचना**—संदर्भग्रंथांमधील माहिती कमीतकमी वेळांत व सुलभतेनें सांपडावी अशा रचनेची असली पाहिजे. अर्थात् एकाच प्रकारची रचना सर्वच प्रकारांच्या संदर्भग्रंथांना साहाकर नसते. या ठराविक रचनापद्धति म्हणजे अक्षरवार किंवा कालक्रमवार किंवा भूप्रदेशावार किंवा वर्गवार अशा असतात. पानें चाळून ह्या पद्धती पहाव्या लागतात. केवळ अक्षरानुक्रम साधलेला आहे कीं शब्दानुक्रमांत अक्षरानुक्रम आहे हें लक्षांत घ्यावें लागतें. एकूण विवेचन स्थूल विषयांमध्यें समाविष्ट केलेलें असेल तर कोणता उपविषय कोणत्या स्थूल विषय नांवाखालीं आला आहे हे देणारी तपशीलवार उल्लेखसूची ( म्हणजे इंडेक्स ) शेवटीं हवी. स्वतंत्रपणें लहान लहान विषयांखालीं विवेचन केलेलें असेल तर "आणखी पहा" हें सांगणारें म्हणजे अन्य संलग्न विषयांचा संदर्भ देणारे "अन्य संदर्भ" ( म्हणजे क्रॉस रेफरन्सेस ) हवेत. सबंध ग्रंथांचे कांहीं भाग पाहून त्यानुसार एकाहून अधिक अक्षरानुक्रमवार विवेचनें आहेत किंवा काय ? त्यामध्यें काय काय वेगळी माहिती दिलेली आहे ? अन्य संदर्भ दिलेले असले तर ते देण्याची पद्धति कोणती ? हें सर्व तपासणें अवश्य आहे. *विशेषानें सांवत्सरिकें ( म्हणजे डिरेक्टरीज ), अभ्याससूची (म्हणजे ब्रिब्लिऑग्रफीज)* याबाबत हें पहावें लागतें.

कालक्रमवारीच्या रचनेंत कालखंडवार किंवा वर्षवार किंवा दिनांकवार सर्व माहिती एकत्रित केलेली असते.

भूखंडवारीच्या रचनेंत राज्यवार, शहरवार, अकारवारीनें किंवा स्थलवर्णन कोशांप्रमाणें (म्हणजे गॅझेटियर्स) किंवा प्रवाशी ज्या क्रमानें प्रवास करील त्या क्रमानें म्हणजे प्रदेशवार माहिती असते.

वर्गवारीच्या रचनेंत एकूण विषयनामें कांहीं नात्यानुसार क्रमानें वर्ग ठरवून एकत्रित करून दिलेलीं असतात.

अनेक संदर्भग्रंथांना उल्लेखसूची (म्हणजे इंडेक्स) अवश्य आहे. या सूचीची रचना पुस्तकांतील विवेचनाला पूरक असली पाहिजे. लहान लहान विषयनामांची अक्षरवार रचना असणाऱ्या पुस्तकात वर्गवार उल्लेखसूची असावी. या वर्गवार उल्लेख सूचींत स्थूल विषयनामांखाली लहान विषयांचा नात्यानुसारी उल्लेख असावा. अन्य प्रकारच्या रचनेंत ही सूची केवळ अक्षरवार तपशिलाची असावी. या सूचींत सर्व विषयाचा अक्षरवार उल्लेख व्हावा. रचनेंत जो कोणताहि क्रम घेतला असेल तो सुसंगत असला पाहिजे.

**प्रतिपादन पद्धति**—एकूण विवेचन सर्वसामान्य वाचकांना समजेल असें सोपें आहे कीं केवळ विद्वानांनाच तें उमगेल असें आहे, ग्रंथ प्रौढांकरितांच लिहिला आहे कीं बालवाचक व सामान्यजन यांकरितांहि तो आहे हें प्रतिपादनाच्या पद्धतीवरून समजून घ्यावें लागतें.

**वैशिष्ट्यें**—अधिक वाचनासाठीं अभ्याससूची (म्हणजे बिब्लिऑग्रफी) स्पष्ट कल्पनेसाठीं चित्रें, सूक्ष्म तपशिलासाठीं तक्ते अशीं कांहीं वैशिष्ट्यांची परिशिष्टें कांहीं ग्रंथामध्यें आढळतात. तीहि आपल्या परीनें विवेचनाच्या भरीवपणाचें दृष्टीनें व उपयोगाचे दृष्टीनें महत्त्वाची ठरतात. त्यांचाहि पूर्ण शोध घेऊन तें सर्व ध्यानांत घेतलें पाहिलें पाहिजे.

**अभ्याससूची**—विषयाभ्यासाला पूरक ठरणाऱ्या अभ्याससूची संदर्भ ग्रंथाला जोडलेल्या असाव्या. त्या संबंधित लेखांच्या, प्रकरणांच्या किंवा खंडांच्या शेवटीं या आरंभीच किंवा समग्र विवेचनाच्या अखेरीस एकत्र दिलेल्या असाव्या.

**चित्रें इत्यादि**—व्यवसायग्रंथ (म्हणजे डिरेक्टरीज) किंवा सरकारी माहिती पुस्तकें (म्हणजे सिव्हिल लिस्ट इत्यादि) अशा संदर्भग्रंथामध्यें चित्रें इत्यादींची आवश्यकता नाहीं. परंतु ज्ञानकोश, चरित्रकोश व शब्दकोश, ललितकलाविषयक भूगोल–इतिहास–पोशाख–व्यवसाय–शिकार किंवा निशाणें–मांडीकुंडी–अलंकार इत्यादि सांस्कृतिक चिन्हें अशांनी माहिती देणारे कोश, यामध्यें जर चित्रें, रेखाकृत्या नकाशे, हे दिलेलें असेल तर ते ग्रंथ फार उपयुक्त ठरतात. मात्र हीं चित्रें स्वच्छ

स्पष्ट आणि सुबोध मथळ्यांची असावीं. विज्ञानविषयक व व्यवसायोद्योगविषयक ग्रंथांमध्यें तीं अगदीं अद्ययावत् असलीं पाहिजेत.

**बाह्यांग**—संदर्भग्रंथांचा वापर फार मोठ्या प्रमाणांत होत असतो. म्हणून तो शक्य तितका टिकाऊ पाहूनच संग्रहात घेतला पाहिजे. या दृष्टीनें त्याचा कागद, छपाई, बांधणी, शिवण हें सर्व तपासून पाहिलें पाहिजे. याप्रमाणेंच चित्रें, छायाचित्रेंहि मुख्य बांधणींत एकजीव झालेलीं व योग्य त्या आकाराची किंवा योग्य तशी घडी केलेलीं असलीं पाहिजेत.

**मूल्यमापनानंतरची जबाबदारी**—ग्रंथालयांत रोजच कांहींना कांहीं पृच्छा घेऊन कोणी ना कोणी वाचक व अभ्यासक येत असतात. त्यांना उपयोगी व्हावे म्हणून कालक्रमशः अधिकाधिक संदर्भग्रंथ जमवीत गेलें पाहिजे. ते जमवितांना वर उल्लेखिलेल्या मूल्यमापनाच्या कसोट्या शक्य तशा व व्यवहार्य तेवढ्या ध्यानांत घेतल्या पाहिजेत. संदर्भसाह्य देण्यांत हीं विविध संदर्भसाधनें हमखास साहाय्यक होतात व ग्रंथालयाविषयीं आणि ग्रंथपालाविषयी सर्व वाचकाभ्यासकांमध्यें अधिकाधिक आपुलकी निर्माण करतात. म्हणून कांहीं कालक्रमयोजनेनें संदर्भसंग्रह जमविला पाहिजे, तो सदैव सिद्ध ठेवला पाहिजे आणि त्याची समग्र माहिती घेऊन ती सर्व शक्य तेवढी करामर्शी नि जिव्हाग्रावर राखली पाहिजे. अनेक प्रकारची माहिती टांचणांचे रूपांत संग्रहिली पाहिजे. कारण मराठींत अद्यापि खात्रीनें अवलंबावे असे आणि तरतम करावे असे संदर्भग्रंथ जास्त प्रमाणांत झालेले नाहींत. इंग्रजींत ते शेकड्यावारी आहेत व त्यांच्या वर्णनाचींहि पुस्तकें झालेलीं आहेत.

## संदर्भाचे प्रकार

**शीघ्र संदर्भ**—*संदर्भार्थ अगणित वाचकाभ्यासक ग्रंथालयांत* येतात. त्यांनीं मागितलेल्या माहितीचें स्वरूप ध्यानांत घेऊन त्या माहितीची वर्गवारी क्षणभरांत मनांतल्या मनांत करावी लागते. विविध संदर्भ ग्रंथामधली माहिती खूपशी सतत मागितली जाणारी, थोडीशी मधून मधून मागितली जाणारी आणि कांहीं अल्पशी मागितली जाणारी अशी मागणीच्या प्रमाणांत तीन प्रकारची असते. संधि नि सवड मिळेल त्याप्रमाणें उपयुक्त संदर्भसाधनांपैकीं शक्य तीं तीं हस्तगत करून ठेवायची असतात. त्यांच्या असंख्यविध तपशिलाची चांगली ओळख करून घेऊन संदर्भसाह्य देण्यासाठीं सिद्ध रहावयाचें असतें. जी माहिती त्वरेच तोंडीन देण्यासारखी असेल ती ग्रंथांच्या वर्गवारीनुसार ठराविकस्थानीं असलेल्या एका किंवा अधिक ग्रंथांतून काढून दाखवावयाची असते. संदर्भसाह्यांत उपयुक्त ठरणारें संदर्भसाहित्य विषयवार एकत्र काढून देता आलें पाहिजे. कोणाला नेपाळचा इतिहास पहावयाचा

असेल तर त्याला नेपाळच्या इतिहासाचीं सर्व पुस्तकें जेथें एकत्र सापडतील तेथे नेलें पाहिजे. एकच पुस्तक काय, त्या विषयाचीं अनेक पुस्तकें एकत्रित पाहून त्या वाचकास केवढी तरी सोय झाल्यासारखी वाटेल. महाराष्ट्रातील उद्योगधंद्यांची माहिती देणारीं पुस्तकें अशींच त्यांच्या ठरलेल्या स्थानीं दिसावी. अमेरिकेंत शेतीची समृद्धी झाल्याचें आपण वाचतो. त्यासंबंधींची सार्यंत माहिती अशीच चटकन दाखवता आली पाहिजे. 'गडकरी' ह्या विषयाच्या अभ्यासकाला 'अप्रकाशित गडकरी' पर्यंतचें एकूण अद्यावत् साहित्य एकत्र मिळाल्यास केवढें मोठें काम झाल्याचा आनंद वाटेल. तसाच त्या त्या मागणीचा उच्चार होतांच त्या त्या मागणी प्रमाणें हवा तितका संदर्भ दाखविल्याचा आनंद संदर्भसाहाय्यकासहि वाटेल. असा जो जो संदर्भ मागणी कानावर पडतांच अगदी शीघ्रतेनें देता येतो त्याला शीघ्र संदर्भ (म्हणजे रेडी रेफरन्स) म्हणावें. ही माहिती जितकी शीघ्रतेनें देता येईल तितका त्या ग्रंथालयाचा व संदर्भसाहाय्यकाचा लौकिक होतो. याकामीं अनेक प्रकारचे संदर्भग्रंथ सेवेसाठी सिद्ध असतात. प्रकाशित वाङ्मयाची माहिती देण्यासाठी 'मराठी ग्रंथसूची' सारखे ग्रंथ किंवा ग्रंथालयसंघाचें कालिक 'सहकार' यात येणाऱ्या याद्या किंवा आदेशिक ग्रंथालयात सरकारी नियमानें येणाऱ्या प्रकाशनांच्या चक्रमुद्रित (सायक्लोस्टाइल) होऊन मिळणाऱ्या याद्या, अगणित विषयांची सारांशानें माहिती मिळण्यासाठी महाराष्ट्रीय ज्ञानकोश किंवा व्यावहारिक ज्ञानकोश किंवा बालांचे दृष्टीनें व्यावहारिक ज्ञान व सामान्य माहिती हीं पुस्तकें, विविध दिवंगत वा विद्यमान व्यक्तींची माहिती देणारीं चरित्रें, चरित्रकोश, सर्व राज्यातील या राष्ट्रांतील या जगांतील राज्यकारभार–उद्योगधंदे–व्यापारव्यवहार यांची माहिती देण्यासाठी व्यवसायग्रंथ (म्हणजे डिरेक्टरीज), विविध विषयांची माहिती देण्यासाठी त्या विषयाचे ज्ञानकोश किंवा माहिती पुस्तकें (म्हणजे हॅंडबुक्स), वाङ्मयसेवकाची माहिती देण्यासाठी अर्वाचीन मराठी वाङ्मय सेवक व त्यासारखे प्रवेशवार माहिती देणारे ग्रंथ, भाषा–व्युत्पत्ति शब्दार्थ–वाक्प्रचार इत्यादि माहिती देण्यासाठी व्युत्पत्ति-कोश किंवा शब्दकोश किंवा वाक्प्रचारकोश, स्थलवर्णनकोश (म्हणजे गॅझेटियर्स), दूरभाषक पुस्तकें (म्हणजे टेलिफोन डिरेक्टरी), आगगाड्यांची–बोटींची–एष्टी गाड्यांचीं वेळापत्रकें व माहिती पुस्तकें असे अनेक प्रकारचे शीघ्रसंदर्भाकामीं साह्य देणारे संदर्भग्रंथ आहेत. या प्रमाणेच ग्रंथालयाची सूची, नियतकालिकांच्या याद्या, सरकारी माहिती पुस्तकें (म्हणजे सिव्हिललिस्ट व हॅंडबुके), नियतकालिकांचे बांधीव वा चालू अंक इत्यादि साधनेंहि याकामी उपयोगी येतात. येणाऱ्या वाचकाभ्यास-काला हवी ती माहितीच काढून घ्यावयाची असते किंवा ती माहिती कशामध्ये सापडेल तें साधन त्याच्या हातांत ठेवायचें असतें. त्याला तें तें देतांना आपण सेवाभावच दाखवायचा असतो आणि त्याचप्रमाणें त्याचे ठायीं सेवा करून घेण्याचा

उच्च पू येऊं न देतां काम करावें लागतें. पृच्छा घेऊन कोणीही वाचकाभ्यासक आला कीं बोलता बोलता त्याला नेमकें काय हवें तें काढून घ्यावें लागतें. कोणाचे ठायींचा बुजरेपणा, तर कोणाचे ठायींचा आगाऊपणा, कोणाचा न्यूनगंड तर कोणाचा अहंगंड, कोणाचा मोठा आवाज तर कोणाचा गप्पीदासपणा हें सर्व नियंत्रित करुन त्याला त्याला हवें तें तें संदर्भग्राह्य द्यावें लागतें, त्याचें समाधान करावें लागतें. असंख्य वेळा कांहीं माहिती चटकन मिळावी या हेतूनेंच संदर्भगरजू वाचकाभ्यासक येतात. अशा सर्वांना वर उल्लेखिलेली ग्रंथसूची, ज्ञानकोश चरित्रकोश, माहिती पुस्तकें, नकाशे इत्यादि साधनें ग्रंथालयांत असलेली सर्व पाहून त्यांची तात्कालिक गरज शीघ्रतेनें पुरी करावी लागते–"आलोड्य ग्रंथपत्राणि विचार्यच पुनः पुनः। अयमेकः सुनिष्पन्नः संदर्भश्च सुनिश्चितः॥" असें त्यांस वाटायला लावलें पाहिजे. येणाऱ्या पृच्छांमध्ये तत्काल माहिती दिली पाहिजे असे कांहीं प्रश्न असतात. म्हणजे हव्या असणाऱ्या माहितींच्या निवडीनुसार संदर्भाचे दोन प्रकार होतात. वर शीघ्र संदर्भाची माहिती दिली.

**विलंबित किंवा सावकाशीचा संदर्भ**—बहुत प्रकारची माहिती सावकाशीनें काढून देण्याचें काम करावें लागतें. वाचकाभ्यासकाच्या निकडीच्या प्रमाणांत यालाच विलंबित किंवा सावकाशीचा (म्हणजे लॉग रेंज) संदर्भ म्हटलें जातें. कितीएक प्रकारची माहिती पुस्तकांमधून पुस्तकें, कालिकांमधून कालिकें, अन्य प्रकाशित साहित्य यांमध्ये डोकें खुपसून काढावी लागते. अन्य स्थानिक वा शालेय-महाविद्यालयीन किंवा राज्यांतील इतर ग्रंथालयांकडूनहि केव्हां माहिती आणावी लागेल. एवढेंच काय, देशांतल्याच नव्हे तर परदेशांतल्याहि माहितगारांकडून माहिती गोळा करावी लागेल. या कामास अर्थातच वेळ लागतो. या वेळाला किंवा सावकाशीलाच उद्देशून या तऱ्हेच्या संदर्भाला सावकाशीचा संदर्भ म्हणणें योग्य आहे. येथेंहि वाचकाभ्यासकांची खात्री पटली पाहिजे कीं, "अयमेकः सुनिष्पन्नः संदर्भश्च सुनिश्चितः।"

**दोन संदर्भ प्रकारांविषयीं दोन चुटकं**— शीघ्र संदर्भसाह्याचें उदाहरण म्हणून मानवमात्रानें बालपणीं ऐकलेली व अनुभवलेली एक गोष्ट घेऊं. थोडी समजूत येत असलेल्या लहानग्या बालकाला "ही हाय आहेऽऽहात भाजेल" हा अनुभव देण्याची परंपरागत प्रवृत्ति आढळते. विस्तवानें हात भाजतो ही आपली माहिती प्रत्येक मोठा माणूस आपल्याजवळच्या लहानग्याला देत असतो. ती माहिती न दिली तर प्रत्येक बालकाला किमान एकदा तरी आपला हात भाजून घ्यावा लागेल. लहानग्यांना हा संदर्भच दिला जातो एक परीनें आणि तो शीघ्रसंदर्भ होय. संदर्भाचा दुसरा प्रकार सावकाशीचा संदर्भ. सावकाशीच्या संदर्भाचे उदाहरण नव्हे

पण सावकाशीच्या संदर्भ साह्याकामी क्वचित् केव्हा केव्हा सावकाशी नि चिकाटी लागते त्या उद्योगाला अनुलक्षून असलेली अन्य संदर्भात रचली गेलेली 'झारिनाचें जांभळें फूल' ही गोष्ट सुचते. अनेकांच्या वाचनांत ती आलेली असेल. जर्मनीचा कर्तबगार राजा म्हणून पुढें गाजलेला राजपुत्र बिस्मार्क हा आपल्या देशाचा शांतिदूत म्हणून रशियाच्या बलाढ्य झारशीं शांतितह करण्यासाठी रशियांत गेला होता. प्रत्यक्ष बोलणीं करण्याआधीं तहाच्या विवक्षित मुद्यांवर चिंतन करण्यासाठीं एकांत मिळावा म्हणून पहाटेच्या शांत समयीं तो राजवाड्याबाहेर पडला. चालता चालता तो एका मोकळ्या मैदानांत पोचला. त्या उघड्या मोकळ्या मैदानांत एक पहारेकरी कशावर तरी पहारा करीत होता. तेथें पहाऱ्याचें उद्दिष्ट कांहींच न दिसल्यानें बिस्मार्कनें पहारेकऱ्यास तें विचारलें. पण तो कांहींच सांगू शकला नाहीं. त्याला तें गूढ उकलून घ्यावेसें वाटलें व झार करवी त्यानें ते उत्तर शोधून काढलें. त्या शिपायाला येथें पहाऱ्यासाठीं पाठवणारा पहाराप्रमुख, नगररक्षकदलाचा प्रमुख, गृहमंत्री, नवे-जुने सेनापती, दफ्तरखाना सर्वांकडे व सर्वत्र तपास घेण्यांत आला. पण कोणाकडूनहि व कोठेंहि कांहींच तपास लागेना. पहाऱ्याचा हेतु शोधून काढण्यामागें झारहि जोरानें लागला. त्यानें त्या कामीं बक्षिससुद्धां जाहीर केलें. होतां होतां राजवाड्यांतील एका जराजीर्ण, सेवानिवृत्त दाईनें त्या कोड्याची उकल केली. झारची आजी नवविवाहित बाला असतांना तें प्रचंड मैदान तिरंदाजीच्या सरावाचें मैदान म्हणून उपयोगिलें जाई. एके दिवशीं तिरंदाजीची क्रीडा चालू असतांना ऋतुचक्र पालटल्याचें चिन्हच असें एक जांभळें सुकुमार पुष्प तेथें उमललेलें त्या झारिनाला दिसलें. प्रथम पुष्पदर्शनाच्या आनंदभरांत ती वाकून पाहूं लागली. तिच्या सख्याहि पाहूं लागल्या. त्याच समयीं तिकडून जाणाऱ्या तत्कालीन झारचें म्हणजे या झारच्या आजोबाचें तिकडे लक्ष गेलें. वत्सलरसाचा मूर्तिमंत परिपोष करणाऱ्या त्या झारिनाला तशी वात्सल्यभरानें वाकलेली पाहून तिचें प्रिय करण्यांत तत्पर असणाऱ्या त्यानें त्या जांभळ्या फुलाचें रक्षण करण्यासाठी तेथें पहारा सुरू केला. पुढें पहाऱ्याविषयीं तो विसरून गेला. आणि तोच पहारा वर्षें गेलीं, पिढ्या गेल्या, झार गेले, झारिना गेल्या तरी अखंड चालूच राहिला. त्या वृद्धेनें सांगितलेली ही कथा लाँग रेंज म्हणजे सावकाशीच्या संदर्भाचें उदाहरण म्हणून सुचली आहे. सावकाशीच्या संदर्भाचें म्हणजे सावकाशीचें. किती तरी वेळ देऊन व किती तरी प्रकारांनी तलास लावण्याचा प्रयत्न करून ती बिस्मार्कला हवी असलेली माहिती मिळविण्यांत आली. आतां 'झारिनाचें जांभळें फूल' ह्या कथानामाचा उच्चार होताक्षणीं ती गोष्ट चटकन सांगता येते. पण मुळात ती शोधून काढतांना किती प्रयास पडतो! कांहीं कांही संदर्भ शोधताना असेच अमर्याद प्रयत्न करावे लागतात. त्या प्रयत्नांस अनुलक्षून विलंबित किंवा सावकाशीचा संदर्भ हें नांव वापरण्यास हरकत नाहीं.

# संदर्भग्रंथ व संदर्भ साहित्य

**संदर्भग्रंथ**'— अर्वाचीन काळीं सर्व देशांच्या साक्षर झालेल्या व रोजच्या-रोज कांहीं एक वाचलेंच पाहिजे अशी सहज प्रवृत्ति बनलेल्या सर्व जनांकरतां ग्रंथालयें चालविण्याचा प्रघात पडला आहे. या सर्व ग्रंथालयांमध्यें रोजच्या रोज कांहीं ना कांहीं माहिती घेण्यासाठीं असंख्य जण येत असतात. प्रगत देशांतील ग्रंथालयें सर्व ज्ञान साधनांनीं सुसज्ज ठेवण्याचा सतत प्रयत्न असतो. परंतु अनेक ज्ञानसाधनें ग्रंथालयांत एका मागून एक आणून ठेवलीं तरी तीं त्या ग्रंथालयांत नि तेथल्या वाचकांच्या सेवेसाठीं आहेत ही माहिती लोकांस झाली पाहिजे. ग्रंथालयानें लोकांस ती माहिती दिली पाहिजे. शिवाय नुसती ही एवढीच माहिती दिल्यानें त्या ज्ञानसाधनांचा उपयोग होऊं लागतो असे होणार नाहीं. विशिष्ट माहिती अमूक एका ठिकाणीं मिळेल, तीसाठीं अन्य शोध नको हें लोकांना कसें कळावें? यासाठीं सर्व प्रगत ग्रंथालयांमध्यें संदर्भशोधक ग्रंथपाल नेमण्याची वहिवाट पडत चालली आहे. त्यानें सर्व वाचकाभ्यासकांना हवें असणारें वाचनाभ्यासाचें साहित्य व त्यासंबंधीं सर्व माहिती पुरवायची असते. मागितली जाणारी माहिती इतकी बहुविध नि संमिश्र प्रकारची असते कीं ती पुरविणें अशक्यप्राय वाटावें. ग्रंथसंख्या इतकी अफाट आहे कीं असे वाटणें अशक्य नाहीं. इतक्या ग्रंथांचा अभ्यास कोणी केलेला असणार! आणि पाहिजे असलेली माहिती नेमक्याच एका पुस्तकांतून हुकमी कशी शोधून काढणार? पण संदर्भ ग्रंथपाल हें काम जाणतो नि चटकन करतो. प्रत्येक विषयावर झालेलीं पुस्तकें ग्रंथसूचीमध्यें एकत्रित आणलेलीं असतात. ग्रंथपाल हें जाणतो व तो अनेक विषयोपविषयांच्या ग्रंथसूची व सर्व विषयांवरील पुस्तकें एकत्रित केलेली संकीर्ण ग्रंथसूची तात्कालिक उपयोगासाठीं स्वतःच्या सन्निध ठेवतो. याप्रमाणेंच अनेक विषयांसंबंधींची माहिती चटकन मिळावी या हेतूनें कांहीं रचनासंकेतानें एकत्रित केलेली असते. असे ग्रंथहि हा संदर्भशोधक ग्रंथपाल जवळ ठेवतो. अशा ग्रंथास ज्ञानकोश म्हणतात. ज्ञानकोश संकीर्ण तसेच विषयवारहि असतात. अनेकदा संस्थांची माहिती हवी असणारे वाचक येतात. त्यांचेसाठीं संकीर्ण स्वरूपाचें कार्य करणाऱ्या संस्थाविषयींचीं तशीच एकेका विषयाचें कार्य करणाऱ्या संस्थांचीं माहितीपुस्तकें ग्रंथालयांत ठेवावीं लागतात. अनादिकालापासून अद्ययावत् काला-पर्यंतचे असंख्य विषयांच्या माहितीचे असंख्य कण या गड्डेच्या गड्डे कालिकांचे अंक पुरवीत असतात. केव्हां एकाच विषयाला वा विषयांच्या गटाला वाहिलेलें कालिक आढळतें. तर केव्हां संकीर्ण विषयांना वाहिलेलें कालिक आढळतें. या पैकी शक्य तितकीं कालिकें ग्रंथपालाला सज्ज ठेवावीं लागतात. संकीर्ण स्वरूपाच्या संग्रहालयांची वा प्रदर्शनांची माहिती कोणास केव्हां हवी असते. तशीच एकेका विषयाच्या वा विषयांच्या गटांच्या संग्रहालय–प्रदर्शनांची माहिती हवी असते. ही माहिती ठेवावी

लागते. नेते, विज्ञानवेत्ते, कलावंत, व्यायामतज्ञ, हुन्नरी, ललितलेखक, अध्यापक, प्रवासी अशांची माहिती कोणी हवी म्हणतात. या प्रकारच्या संदर्भगरजूंसाठीं चरित्र विषयक माहिती देणारे संकीर्ण स्वरूपाचे चरित्रकोश तसेच विषयवार चरित्रग्रंथहि तयार ठेवावे लागतात. देशाची-राज्याची-जगाची सर्वांगीण माहिती अनेकांस हवी असते तर कोणास त्या त्या भूप्रदेशाची एकेका विषयाचीच माहिती हवी असते. ही माहिती देणारीं माहिती पुस्तकें इत्यादि ग्रंथालयांत असणें अवश्य आहे. केव्हां कोणास एकाच व्यक्तीचे समग्र ग्रंथ हवेसे वाटतात. तर कोणास एका व्यक्तीविषयींचे ग्रंथ हवे असतात. कोणाला रसायनाचीं वा व्याकरणाचीं वा छंदःशास्त्राचीं वा तत्त्वज्ञानाचीं वा कायद्याचीं सूत्रे हवीं असतात. कोणाला जगाचे वा देशादेशांचे नकाशे पहावेसे वाटतात. कोणाला भाषेचे तर कोणाला परिभाषेचे शब्दकोश हवे असतात. कोणाला परिषदा, मंडळें अशांचे वृत्तांत पहाण्याची गरज निर्माण होते. कोणाला विषयाविषयाचा वा प्रदेशाचा इतिहास हातीं घ्यावासा वाटतो. अगणित प्रकारचे संदर्भ मागत ग्रंथालयाकडे लोक वळतात. त्यांच्यासाठीं अशी अगणित प्रकारची माहिती देण्याकामीं उपयुक्त असणारीं पुस्तकें व ती माहिती अमक्या पुस्तकांत मिळेल हें दाखवून देणारा संदर्भतज्ञ ग्रंथपाल ग्रंथालयें ठेवतात. वर उल्लेखिलेल्या विविध प्रकारची माहिती देणारे ग्रंथ हे सर्वसामान्यतः दोन गटांत ठेवता येतील. एक संकीर्ण संदर्भग्रंथ व दुसरा विषयवार संदर्भग्रंथ. क्रमशः या सर्व संदर्भसाहित्याची माहिती पुढील प्रमाणें घेऊं या.

**ग्रंथसूची** — ग्रंथसूची म्हणजे ग्रंथनामांचा एकत्रित संग्रह. ग्रंथांचीं वा ग्रंथकारांचीं नावें देणें हें या ग्रंथांचें कार्य. कोठेंहि व कोणाकडूनहि, कोणत्याहि भाषेंत, कोणत्याहि आकारांत प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें असोत, तीं सूचीमध्यें समाविष्ट होऊं शकतात. तीमध्ये हस्तलिखित वा मुद्रित ग्रंथांचीं तशींच कालिकांचीं वा कालिकांतील लेखांची, चित्ररूप ग्रंथांचीं नावें येऊं शकतात. ज्ञानवाहक म्हणून जें जें असेल तें तें सूचीमध्ये बसतें. कांही विवक्षित पद्धतीनें केलेली कोणत्याहि एकाच विषयावरील पुस्तकांची संपूर्ण किंवा निवडक यादी, एखाद्या विशिष्ट ग्रंथाचें संपूर्ण नांव, ज्या मालेंत एक ग्रंथ प्रसिद्ध झाला त्याच मालेंतील इतर पुष्पें, लेखकनामें, त्यांचीं टोपण नावें, मूळ नावें, पर्यायी ग्रंथनाम अशा तपशिलांपैकी कोणतीहि माहिती अनेक वेळा विचारली जाते. ही माहिती देणें सुकर व्हावें म्हणून ग्रंथपालांनीच शोधून काढलेलें सूची हें साधन आहे. प्रत्येक ग्रंथपालास किंवा अन्य कोणासहि एकूण सर्व प्रकाशित ग्रंथांची माहिती मुखोद्गत असणें कठिण. म्हणून ग्रंथसूची हें साधन तयार झालें आहे व तें सर्वत्र वापरलें जातें. ग्रंथसूची म्हणजे वाङ्मयांत समाविष्ट झालेल्या पुस्तकांचीं वा लेखकांचीं वा लेखादि वाचनीयांचीं नावें

सुचवणारी विशिष्ट पद्धतीनें केलेली यादी. ही यादी क्वचित् एकाच लेखकाच्या पुस्तकांची किंवा एकाच विषयाच्या पुस्तकांची किंवा लेखक-ग्रंथनामें-अन्य वाचनीयें या सर्वांची संमिश्र यादी असते. मुद्रणाच्या शोधामुळें ग्रंथनिर्मिति व लेखनप्रकाशन अलोट प्रमाणांत होऊं लागलें. या अफाट संख्येनें प्रसिद्ध होणाऱ्या वाङ्मयांतून जें हवें तें शोधून काढता यावें याकरतां ग्रंथसूची उदयास आली. सूचीच्या रचनेंत विविधता असूं शकते. कांहींची लेखकवार अक्षरवारीनें मांडणी असते. कांहींमध्यें एकाच विषयाची त्याच्या शाखोपशाखांनुसार मांडणी असते. पण बहुशः सर्वच सूची वर्गीकृत असतात. कांहींमध्यें प्रसिद्धी वर्षाचा क्रम असतो. त्यामुळें विषयाचा विकासक्रम दिसून येतो. ज्या सूचींत लेखकवार अक्षरवारी नसते किंवा वर्गवारी नसते किंवा असली तरीहि तीमध्यें एकूण नोंदींची उल्लेखसूची (म्हणजे इंडेक्स) शेवटीं अवश्य पाहिजे. उल्लेखसूचीचें उत्तम उदाहरण म्हणजे मराठी ग्रंथसूचीकार शं. ग. दाते यांच्या सूचीचा संदर्भ कोश. ग्रंथसूचीमधील तपशील अचूक लक्ष देऊन नमूद झालेले असले पाहिजेत. कोणताहि तपशील सुटता उपयोगी नाहीं. खात्री झाल्याशिवाय कांहीहि नोंदलें जाता कामा नये. नेमक्या मर्यादेंतलें वर्णनात्मक टिपण हवें. स्वमतदर्शक टीका उपयोगी नाहीं. अशी साक्षेपानें तयार झालेली सूची एकाच लेखकाचीं किंवा एकाच विषयाचीं निवडक पुस्तकें कोणतीं हें दाखवील. खरेदी करते वेळीं मार्गदर्शन करील. काय लिहून झालें आहे तें दाखवून काय लिहावयासारखें आहे हें सुचतील. केव्हां ग्रंथसूची राष्ट्रीय ग्रंथसूची म्हणून रचली जाईल. एका राष्ट्रांतील एकूण प्रकाशित ग्रंथांच्या यादीला राष्ट्रीय ग्रंथसूची म्हणतात. ग्रंथविक्रेते या प्रकाशक देहि ग्राहकांसाठी आपल्या याद्या प्रसिद्ध करतात. ग्रंथसूचीकार शं. ग. दाते यांची मराठी ग्रंथसूची हें राष्ट्रीय ग्रंथसूचीचेंच उदाहरण होय. कलकत्याच्या राष्ट्रीय ग्रंथालयाद्वारें अलिकडे राष्ट्रीय ग्रंथसूचीचें काम सुरू झालें आहे. या सर्व तऱ्हांच्या सूचींना पुरवण्या काढाव्या लागतात. प्रकाशकांना तर सततच आपल्या याद्या ताज्या तयार कराव्या लागतात. ही सूची म्हणजे बत्तीसाशपत्री आकाराची केवळ एकदोन पानांची पुस्तुकली असेल किंवा मराठी ग्रंथसूचीसारखा तावभर आकाराच्या पंधराशेंवर पृष्ठसंख्येचा ग्रंथराज असेल. तिचें मूल्यमापन करतांना तिचें उद्दिष्ट, व्याप्ती, रचनापद्धती, कर्त्याचा पूर्वानुभव, प्रस्तावना, परिशिष्टे, वैशिष्ट्यें अशा गोष्टी ध्यानांत घेतल्या पाहिजेत. अन्य सर्व संदर्भग्रंथांप्रमाणेंच सूचीच्या गुणमापनाचीं गमकें तिचीं पानें वारंवार चाळल्यासच नीट माहिती होतात, ध्यानांत रहातात व त्यांचा उपयोग समजतो.

**मराठी भाषेंतील ग्रंथसूची** — (१) आपल्या येथील पहिला प्रयत्न म्हणून सन १८५९ मध्ये प्राचीन आणि अर्वाचीन संस्कृत आणि प्राकृत व मराठी

हिंदुस्थानी व गुजराती ग्रंथनामसंग्रह असलेली ९३ पृष्ठांची "ग्रंथालये या नांवें करून पुस्तकांची नामवही स्पष्ट मराठी भाषेंत शामराव मोरोजी यांनीं शके १७८१ त केलेली" ग्रंथसूची उपलब्ध झालेली आहे तिचा उल्लेख करता येतो. (२) सन १८६७ मध्यें मुंबई सरकारच्या हुकमावरून अलेक्झांडर ग्रँटच्या नेतृत्वानें सन १८१८ ते १८६४ पावेतो प्रकाशित झालेल्या ग्रंथांची सूची प्रसिद्ध झाली. तीमधील मराठी विभागाला भारताचे द्रष्टे राष्ट्रपुरुष महादेव गोविंद रानडे यांची विवेचक प्रस्तावना आहे. (३) पुढे सन १८९८ च्या सुमारास न्यायमूर्ति रानडे यांनींच १८१८ ते १८९६ पावेतोंच्या वाङ्मयाचा ग्रंथवर्णन शास्त्रार्शी सुसंगत असा आढावा वर उल्लेखिलेल्या प्रस्तावनेचें सूत्र घेऊन 'ए नोट ऑन दि ग्रोथ ऑफ मराठी लिटरेचर' या नांवानें प्रसिद्ध केला. याचेंच रूपांतर हैदराबादचे कै. प्राध्यापक चिं. नी. जोशी यांनीं *'मराठी वाङ्मयाची अभिवृद्धि'* या नांवानें केलेलें आहे. आपल्याकडील मुद्रणाची त्या काळांत प्राथमिक अवस्था होती. तरीहि आपलें वाङ्मय सावकाशीनें पण निश्चितपणानें गति घेत होतें हें त्यावरून दिसतें. या काळातली आणखी एक गोष्ट महत्वाची गणावी अशी या आढाव्या-वरून दिसते. जार्व्हिस, कँडी, स. का. छत्रे, दादोबा पांडुरंग व भास्कर दामोदर पाळंदे यांनी सरकारी आज्ञेनें शालोपयोगी क्रमिकें पहिल्यांदाच तयार केली. (४) १८६७ पासून सरकारचा 'छापखाने व ग्रंथनोंद' या विषयीचा कायदा झाला आणि मुद्रित होणारी सर्व पुस्तकें सरकारकडे सादर होऊं लागलीं. तेथपासून आतांपर्यंत सरकारच्या 'ग्रंथतपासनीस' या अधिकाऱ्यांद्वारें दर तिमाही-मधील प्रकाशित ग्रंथ–मासिकांच्या एकत्रित याद्या प्रसिद्ध होत आहेत. (५) 'दि लिटररी वर्क ऑफ दि अमेरिकन मराठी मिशन, १८१३–१८८१,' (६) 'क्लासिफाइड कॅटलॉग ऑफ मराठी खिश्चन लिटरेचर अॅट दि क्लोझ ऑफ दि नाइंटींथ सेंच्युरी' व (७) 'ए कॅटलॉग ऑफ मराठी खिश्चन लिटरेचर ड्यूरिंग एटी यीअर्स, १८१३ टु १८९२' या तीन सूचीहि अभ्यासकानें ध्यानांत घेणें अवश्य आहे. (८) एकंदर मराठी वाङ्मयाचा शोध घेण्याचा पहिला सर्वस्पर्शी प्रयत्न ज्ञानकोश मंडळाचे य. रा. दाते व रा. त्र्यं. देशमुख यांच्या 'महाराष्ट्रीय वाङ्मयसूची, १९१९' या सूचींत आहे. हा प्रयत्न अपूर्व होता. सन १८१० ते १९१६ पर्यंतची ही सूची आहे. काल १०७ वर्षांचा आहे. ज्ञानकोशाच्या आकाराची पानें ५२५ आहेत. त्यामध्यें डॉ. केतकरांची प्रस्तावना, ग्रंथाच्या तया-रीची माहिती, लेखक–पुस्तकें–कालिकें यांच्या याद्या ही प्रकरणें आहेत. हींत सुमारें पांच हजार लेखकांची व दहा हजार ग्रंथांची नोंद आहे. वर्गीकरण पद्धती अनुभव-सिद्ध नि व्यवहार्य अशी घेतली गेलेली नाहीं. त्यामुळें तींत सुबोधता नाहीं. (९) या ज्ञानकोश मंडळाद्वारें निघालेल्या सूचीनंतरच्या समग्र मराठी ग्रंथांची नोंद

करण्याचा प्रयत्न 'मराठी ग्रंथसूची, १८००–१९३७' हा होय. ह्या ग्रंथसूचीचे कर्तेहि एक दातेच आहेत. या श्री. शंकर गणेश दाते यांच्या मागे कोणतीहि संस्था नव्हती. त्यांनीं अगदी एकस्थानेंच हें कार्य जणूं व्यवसाय म्हणून अंगीकारलें. हा प्रयत्न मराठी वाङ्मयाच्या व ग्रंथपालनाच्या इतिहासांत अतुलनीय आहे. जसजशीं यांचीं पानें पुनःपुन्हा चाळावीं तसतसे याचे नवनवे विशेष नव्या नवलाईनें आणि ठळठळीतपणें नजरेंत भरूं लागतात. सन १८०० ते १९३७ पर्यंतच्या पुस्तकांचा यांत समावेश आहे. हा काल १३७ वर्षांचा आहे. सबंद तावभर आकाराचीं १५२८ पाने आहेत. त्यांमध्यें दोन खंड ग्रंथवर्णन कोश व संदर्भ कोश या नांवाचे आहेत. पहिल्या खंडांत ग्रंथसूचि शास्त्रावरील प्रबंध, दशांश वर्गीकरणाचीं कोष्टकें, विषयानुक्रमानें वर्णनात्मक सूची हे भाग आहेत. दुसऱ्या खंडांत संदर्भकोश म्हणजे ग्रंथकार-नामें, ग्रंथनामें व विषय यांची अक्षरवार सूची आहे. शक्य तों लेखकजन्मवर्षेंहि मुद्दाम मिळवून नमूद केलीं आहेत. 'पाहिल्याशिवाय नोंद करायची नाहीं' हा दंडक पाळल्यामुळें सर्व तपशील बिनचूक आहे. एकूण छपाई उत्कृष्ट झाल्यामुळें उठाव आरशासारखा आहे. सन १८०० ते १९३७ या १३७ वर्षांच्या कालविस्तारांतले सुमारें एकोणीस हजार ग्रंथ कर्त्यांला उपलब्ध झाले. ज्ञानकोशमंडळाचे श्री. य. रा. दाते यांच्या सूचीनंतर म्हणजे १९१७ पासून १९३७ पावेतोंच्या वीस वर्षांत नवीं नऊ हजार पुस्तकें प्रकाशित झाल्याचे दिसतें. न्यायमूर्ति रानडे, य. रा. दाते व शं. ग. दाते यांच्या सूचीवरून स्पष्ट दिसून येतें कीं एकूण वाङ्मय, वाङ्मयाभिरुचि व या दोन्हींस आवश्यक अशी शिक्षण प्रवृत्ति हें सर्व क्रमानें वाढत आहे. अर्थात हें सर्व वाढलेंच पाहिजे. नाहींतर समाज प्रगत होणारच नाहीं. समाजाच्या शैक्षणिक स्थितीचें, अभिरुचीच्या उंचीचें, आधिभौतिक प्रगतीचें प्रतिबिंब वाङ्मयात पडतें व त्याचें मोजमाप अशा सूचींच्या साह्यानें करता येतें. एकूण ग्रंथसंख्या किती, एक एका विषयावरचे ग्रंथ किती, कोणत्या विषयावर थोडेच ग्रंथ आहेत, कोण-त्यांवर मुळीच नाहींत, कोणत्या विषयाची ग्रंथसंख्या पुष्ट दिसते, असलेली पुष्टी इष्ट कीं अनिष्ट, कोणते लेखक कोणत्या प्रकारचें वाङ्मय प्रसृत करीत आहेत, कोणत्या लेखकांनीं समाजाला स्वतःकडे आकर्षिलें आहे, त्यांच्यामुळें समाजाला कोणतें वळण मिळालें आहे, कोणत्या कालांत कोणत्या वाङ्मय शाखेंत भर पडली, ती कोणाकडून, त्यांत फरक केव्हां–कोणामुळें कोणत्या परिस्थितीमुळें पडला, त्याचवेळीं दुसरी एखादी वाङ्मय शाखा वाढूं लागली असेल ती कोणामुळें, स्त्रियांनीं किती व काय काय लिहिलें, बालांकरतां वा वृद्धांकरतां वा स्त्रियांकरतां वा दलितांकरतांच विशिष्ट दृष्टिकोनानें काय लिहिलें गेलें, ऐतिहासिक वा सामाजिक वा पौराणिक वा औद्योगिक वा वैज्ञानिक ग्रंथ किती, अनुवादित किती, संदर्भ ग्रंथ किती,

कोणते प्रकाशक उदयास आले – भरभराटले – नामशेष झाले – कां झाले, इत्यादि वाङ्मयाच्या वाढीच्या दृष्टीनें महत्त्वाचे असे असंख्यविध मुद्दे ग्रंथसूचींच्या अवलोकनानें सुचतात व अभ्यासता येतात. अर्थात् ग्रंथसूची ठराविक काल-मर्यादेपर्यंतचीच माहिती देते. पुढें तें काम अखंड चालू राहिलें पाहिजे. श्री. शं. ग. दाते यांनीं आपली मूळसूची १९३७ अखेरची १९४४ मध्यें प्रकाशित केली व त्यापुढें १९३८ ते १९५० अखेरची पुरवणी १९६१ मध्यें प्रसिद्ध केली आहे. या बारा वर्षांच्या काल विस्तारांतली सुमारें आठ हजार पुस्तकें या पुरवणींत नमूद झालीं आहेत. (१०) प्रा. मु. श्री. कानडे यांनीं संपादिलेली ' मराठी दोला-मुद्रितें ' या १८६७ पावेतोंच्या आद्यमुद्रितांच्या सूचीचाहि निर्देश केला पाहिजे. निश्चित तंत्रबद्ध नसलेली पण शक्य तशी संकलित केलेली बहुशः दरमहा एक ल्हानशी सूची महाराष्ट्र ग्रंथालय संघाच्या ' साहित्य सहकार ' या कालिकांत प्रसिद्ध होत असते. प्रादेशिक ग्रंथालयाचीहि अशी एक यादी महिनावार चक्रमुद्रित होऊन निघत असते. साहित्य पत्रिकेतूनहि अलिकडे अशी यादी दिसते.

**नमुन्याचीं इंग्रजी उदाहरणें** — (१) केंब्रिज बिब्लिऑग्राफी ऑफ इंग्लिश लिटरेचर. खंड ४. मॅक्मिलन. १९४१. —सन १९०० पावेतोंच्या ब्रिटिश साम्राज्यां-तील इंग्रजी साहित्याची सूची. ग्रंथनामाप्रमाणेंच टीकात्मक व चरित्रात्मक लेखांचाहि समावेश हींत केलेला आहे. विवक्षित कालखंडांमध्यें कालक्रमशः वाङ्मय प्रकारांची माहिती विद्यापीठें, महाविद्यालयें, सार्वजनिक ग्रंथालयें येथें उपयुक्त व्हावी अशी दिलेली आहे. ह्या सूचीचें कार्य अव्याहत आणि अद्ययावत् ठेवण्याचें काम ' दि यीअर्स वर्क इन इंग्लिश स्टडीज ' व ' दि ॲन्युअल बिब्लिऑ-ग्राफी ऑफ इंग्लिश लॅंग्वेज ॲंड लिटरेचर ' हीं दोन वार्षिकें करीत आहेत. (२) क्युम्युलेटिव्ह बुक इंडेक्स : ए वर्ल्ड लिस्ट ऑफ बुक्स इन दि इंग्लिश लॅंग्वेज, १८९८–तारीख तागायत. विल्सन, न्यू यॉर्क. सन १८९८ मध्यें सुरू झालेल्या या सूचींत जगाच्या कोणत्याहि भागांत प्रसिद्ध झालेल्या इंग्रजी ग्रंथांचा समावेश केला जातो. ही सूची मासिक रूपात प्रसिद्ध होत असते व प्रत्येक वर्षाअखेर आणि पांच वर्षांअखेर या कामाचें एकत्रीकरण करण्यांत येतें. (३) ब्रिटिश नॅशनल बिब्लिऑ-ग्राफी, लंडन. ब्रिटिश म्यूझियम ग्रंथालयाच्या आधारें ही सूची तयार करण्यांत येते. परंतु अनेक पुस्तकें निवडून व अनेक वगळून ही तयार होत असल्यामुळें ती संपूर्ण असूं शकत नाहीं.

**अभ्याससूची** — येथवरचें विवेचन समग्र वाङ्मयशाखांच्या एकत्रित केलेल्या संकीर्ण ग्रंथसूचींचें आहे. ग्रंथसूचींचा दुसरा प्रकार म्हणजे कोणत्याहि एकाच वाङ्मयशाखेच्या अभ्यासाच्या सूचींचा म्हणजेच विषयवार सूचींचा. उदाहरणार्थ

गणित या विषयावरील पुस्तकांची यादी. शिकार या विषयावरील पुस्तकांची यादी. शुद्धलेखनविषयक पुस्तकांची यादी. महात्मा गांधींनी लिहिलेल्या त्याचप्रमाणे त्यांच्यासंबंधीं इतरांनीं लिहिलेल्या पुस्तकांची व लेखांची एकत्रित यादी. थोडक्यांत कोणत्याही एकाच विषयाच्या अभ्यासाला उपयुक्त असणाऱ्या पुस्तकांच्या विषयवार याद्या म्हणजे अभ्याससूची. या प्रकारांत एक लेखक हाहि एक अभ्यास विषय होतो. उदाहरणार्थ वर म्हटल्याप्रमाणे गांधी हा एक विषय होतो. मराठींत असे एकेक. विषयाचे अभ्याससूचीचे प्रयत्न अद्यापि जास्त प्रमाणांत नाहींत. इंग्रजींत अशीं असंख्य उदाहरणें आहेत. ' गर्ट्रूड एच्. हिल्ड्रेथ कृत 'ए बिब्लिऑग्राफी ऑफ मेंटल टेस्टस् अँड रेटिंग स्केल्स. सायकॉलॉजिकल कॉर्पोरेशन. न्यूयॉर्क. १९३३' हें अभ्याससूचीचें एक उदाहरण म्हणून दाखविण्यासारखें आहे. प्रा. श्रीराम शर्मांचें ' ए बिब्लिऑग्राफी ऑफ मुघल इंडिया ' हेंहि एक उत्तम उदाहरण आहे.

**लेखकसूची अथवा ग्रंथकार सूची** — एकाच लेखकाच्या सर्व कृतींची यादी, ग्रंथनामें, विषय या कालक्रम यांपैकी एका विशिष्ट क्रमानें दिली जाते. याचें एक ठळक उदाहरण म्हणजे प्रा. अ. का. प्रियोळकरकृत " मुद्रित तुकाराम वाङ्मय ". श्री. मु. ग. पानसे यांच्या 'लिंग्विस्टिक पिक्यूलिॲरिटीज ' या प्रबंधांतली ' ज्ञानेश्वरसूची ' हेंहि एक उदाहरण आहे. ' ज्ञानेश्वर ' या विषयावर असंख्य अभ्यासकांनीं आत्तां पावेतों लिहिलें आहे. त्या सर्व प्रकट लेखनाची सूची, ज्ञानेश्वरजीवन, ग्रंथ, तत्वज्ञान, कार्य, एतद्विषयक ग्रंथ, लेख, आढावसार या विषयवारीनें श्री. म. प. पेंडे यांनीं तयार केली आहे. महाराष्ट्र ग्रंथालय संघाचें कालिक ' साहित्य सहकार ' यांत वा. म. जोशी, श्री. व्यं. केतकर, न. चिं. केळकर आदि लेखकांविषयींच्या सूची देण्याचा प्रयत्न श्री. गो. रा. परांजपे वगैरेंनीं केल्याचें आठवतें. हे प्रयत्न त्या त्या विषयाभ्यासाला अत्युपयोगी होतात. नागपूरचें उत्तम मासिक वर्षभरांतील लेखांची सूची देत असतें. पूर्वी पुण्यांत प्रसिद्ध होत होतें त्या सह्याद्रि मासिकांतहि अशी सूची देण्यांत येत असे. मराठींतलीं हींच ठळक उदाहरणें. ग्रंथाला कालिकांच्या प्रत्येक अंकाला अनुक्रमणिका जशी उपयुक्त व अवश्य आहे तशीच अशी सूचीहि अतिशय अभ्याससाहाय्यक आहे. इंग्रजींतील मर्ले जॉन्सनकृत ' ए बिब्लिऑग्राफी ऑफ दि वर्क्स ऑफ मार्क ट्वेन ' हार्पर. न्यूयॉर्क. १९३५. हें लेखकसूचीचें एक नमुनेदार उदाहरण म्हणून उद्धृत करण्यासारखें आहे.

**हस्तलिखित व टंकित याद्या** — छापील याद्या व ग्रंथसूची वापरणारांस अनेकदा असें आढळून येतें कीं ते ज्या ग्रंथालयांत जातात तेथें त्यांनीं पाहिलेल्या ग्रंथसूचींतील अनेक वाचनीयें नसतात. ग्रंथालयांत येणाऱ्या अशा अभ्यासकांच्या

सोयीसाठी केवळ त्या त्या ग्रंथालयांतील वाचनीयांच्याच हस्तलिखित या टंकित याद्या ठेवण्यांत येतात. त्या त्या ग्रंथालयांत अशा याद्यांचा अर्थातच संपूर्ण नि निश्चित उपयोग होतो. तेथल्या अभ्यासकांना तेथील सर्व पुस्तकांची अशी माहिती मिळाल्यानें त्यांचा उत्साह द्विगुणित होतो. अशा याद्या वापरून वापरून खराब होत असतात. त्या सतत सुदर्शनीय राखल्या पाहिजेत. ग्रंथसूची म्हणजे पुस्तकांचें माहितीपुस्तकच होय. तें शक्य तेवढें अखंड परिपूर्ण व सुदर्शनीय असावें.

**ग्रंथसूचींची ग्रंथसूची** — पाश्चिमात्य देशांमध्यें ग्रंथसूचींची निर्मिति फार मोठ्या प्रमाणांत झालेली आहे. ही संख्या एवढी मोठी वाढलेली आहे कीं त्या ग्रंथसूचींच्याहि ग्रंथसूची निर्माण झाल्या आहेत. यापुढें या ज्या ग्रंथसूचींच्या ग्रंथसूची झालेल्या आहेत त्यांच्या सूची तयार करणें हें एक अपरिहार्य व अवश्य काम होऊन जाईल. नव्हे, झालेंहि आहे. मराठींत असें तुरळकहि उदाहरण नाहीं. मुळांत विषयवार सूचीच अल्प आहेत. ग्रंथसूचींच्या सूचींचें नॉर्थप, क्लार्क, सदरलॅंडकृत 'ए रजिस्टर ऑफ बिब्लिऑग्राफीज ऑफ दि इंग्लिश लॅंग्वेज ॲंड लिटरेचर.' येल विद्यापीठ हें उदाहरण आहे.

**ज्ञानकोश** — विविध ज्ञान व माहिती यांचा एकत्रित संग्रह म्हणजे ज्ञानकोश. ग्रंथसूची प्रमाणेंच हाहि महत्वाचा संदर्भग्रंथप्रकार आहे. ग्रंथालयामध्यें विचारल्या जाणाऱ्या असंख्य प्रश्नांपैकीं आणि मागितलेल्या माहितीपैकीं अनेकविध पृच्छांची उत्तरें ज्ञानकोशाच्या साह्यानें देता येतात. यालाच कोणी विश्वकोश, कोणी सर्वसंग्रह, कोणी विविधज्ञानसंग्रह म्हणतात. श्रीसत्यदेवाला कोणत्याहि नांवानें आळवा. मनापासून आळवलें तर तो मनोवांछितें पुरी करतो असें पोथी सांगते. अगदीं त्याप्रमाणें ज्ञानकोशाचीं पानें चाळीत बसलो तर मनात येईल ती माहिती याची पानें पुरवितात ही सत्यकथा आहे. 'भक्त्येव तुष्टिमभ्येति कोशो नान्येन केनचित् ।' ज्या कोणाला कोणत्याहि एका विषयाची अगदी तातडीनें जी माहिती हवीसें वाटेल त्यानें ज्ञानकोश पहावा. कोणत्याहि अधिकृत ज्ञानकोशांत ती सांपडेल.

ज्ञानविश्वातील एकूण घटकाची–यच्चयावत् अणूरेणूची सुद्धा कांहीं ना कांहीं माहिती ज्ञानकोशाच्या पानामध्यें आलेली असते व त्या माहितीचा असंख्य मंडळी नेहमी उपयोग करून घेतात, या विषयींचा चुटका सांगण्यासारखा आहे. श्री. भोवानीपुरम् लेग्वराजन् सांबमूर्ति यांनी आपले मित्र एन्नावरम् सगुणरूपम् कृष्णमूर्ती यांना आपल्या विवाहाच्या पहिल्या वाढदिवशीं एक पत्र लिहिलें त्यांत हा मजकूर होता. "गतसंवत्सरी सौ. मनमोहिनी अम्मादी माझें शुभमंगलम् झालें. पहिले दोन तीन महिने मला सारला अचंबा वाटे कीं मनमोहिनी इतक्या असंख्य विषयांवर किती चांगली माहिती देते. अनेकदां आजचा विषय पुन्हा उद्या सुरू करून मला ती

आपली प्रगल्भता दाखवी व दिपवी. पण ते तीन चार महिने गेले नि त्यांतली मोहिनी सपली. तिला कांहीं जास्त माहिती असायचीच. हें एक मी लपवीत नाहीं. आणि त्या मुद्याचा कंटाळवाणा कीसहि ती काढी. हें दुसरें. मी अगदीं कंटाळू लागलें. अशा समर्यांच तुम्हीं माझ्याकडे आला होता. मी माझी अडचण तुमच्यापाशी एक दिवस बोललों व तुम्ही जो उपाय सांगितला तो मी नंतर निर्धारानें केला. माझ्या मामांनीं मला बक्षीस दिलेला ज्ञानकोश मी श्री बाला सरस्वती विद्यालयमला मामांच्या नांवानेंच देणगी म्हणून देऊन टाकला. आणि काय चमत्कार सांगूं ! मनमोहिनीचीं प्रवचनें हळूहळूं संपुष्टात येऊं लागली असें मला स्पष्ट दिसूं लागलें. आतां अलिकडे तर मला कोणते, काय नि कितपत बोलणें रुचतें हा विचार करुनच ती बोलते असें दिसतें. वर उलट मीच कांहीं नवें तिला सांगावें असें ती अपेक्षिते. मी सांगितलेले मानते, तें ऐकून प्रसन्न मनानें स्वस्थ होते. तुमच्या सूचनेप्रमाणें ज्ञानकोश मी घराबाहेर घालवला पण प्रसन्नता घरात आणूं शकलो आहे. याचा मला केवढा आनंद वाटतो आहे. *माझी मोहक मनमोहिनी आतां सर्व अर्थानीं नि दृष्टीनीं खरी* खरी मनमोहिनी झाली आहे."

टू एस्. कृष्णमूर्ति भो. ले. साबमूर्ति

ग्रंथसूची पुस्तकें व लेखक यांची माहिती देते. शब्दकोश शब्दांची 'माहिती देतो. ज्ञानकोश ज्ञात विश्वांतील वस्तुमात्राविषयीं व अज्ञात अनंतांतील गहन तत्त्वाविषयींहि माहिती देतो. मनुष्यमात्राच्या ज्ञानशोधाच्या, ज्ञानग्रहणाच्या, ज्ञानदानाच्या झालर्मेतून अवतीर्ण झालेला व ज्ञान संपादनार्थ जे. जें आवश्यक त्याची माहिती देणारा ग्रंथ म्हणजे ज्ञानकोश. '*ज्ञानाच्या प्रत्येक शाखेतील विषयोपविषयावर अक्षर*-वारीनें माहितीपूर्ण लेखांक देणारा सर्वसंग्रहात्मक ग्रंथ किंवा याच रीतीनें एकेका विषयावर सकीर्ण माहितीचे लेखांक देणारा त्या त्या विषयापुरता मर्यादित ग्रंथ म्हणजे ज्ञानकोश. ' म्हणजेच ज्ञानकोश संकीर्ण असतो, तसाच विषयवार असतो. इंग्रजींत याला सायक्लोपीडिआ किंवा एन्सायक्लोपीडिआ म्हणतात. सायक्लोपीडिआ या ग्रीक शब्दाचा अर्थ सर्कल ऑफ सायन्सेस म्हणजे शास्त्रांचें मंडल, म्हणजेच शास्त्राची सर्वांगीण माहिती. असे ग्रंथ तयार होणें हें राष्ट्राच्या विद्याव्यासंगाचें ठळक लक्षण आहे.

**प्रकार**—व्यासंगी प्रौढांकरितां तपशीलवार माहिती देणारा, सर्वसामान्यांकरता सोप्या भाषेत वेचक माहिती देणारा, बालवाचकांकरता त्यांच्या कक्षेतील विषयांची सुबोध नि रंजक शैलींत माहिती देणारा, एकखंडी, अनेकखंडी आणि हेच सर्व प्रकार असणारे विषयवार ज्ञानकोशहि असतात. व्यासंगी प्रौढांकरता बहुशः दीर्घ लेखांमध्येंच त्या त्या विषयांशी संबंधित लहान लहान विषयहि दिलेले असतात. उदाहर-

णार्थ लेखनकला या विषयनामाखाली प्राचीन लेखनपद्धती, लिपी, साहित्य व साधनें यांची सर्व माहिती देण्यांत येते. या सर्व लहान लेखांची उल्लेखसूची त्यांच्या विवेचनाच्या पृष्ठांचे उल्लेख देणारी शेवटीं दिली जाते व तीवरून हवा तो विषय सापडतो. एन्सायक्लोपीडिआ ब्रिटानिकाची तद्वीच महाराष्ट्रीयज्ञानकोशाची रचना अशी आहे. प्रौढांकरतांच असलेल्या अन्य प्रकारच्या ज्ञानकोशांमध्यें सर्व लहानमोठे विषय त्यांच्या आद्याक्षरवारी घेऊन त्यावरचे लेख स्वतंत्र असे दिलेले असतात. अशांची एकूण रचना अक्षरवारीनें असल्यानें त्यांस उल्लेखसूचीची गरज उरत नाहीं. मात्र अशा ज्ञानकोशांमधील माहिती विस्तृत असत नाहीं. त्यांचें हें सारांशरूपत्व व अक्षरवारीची रचना यांमुळें त्यांस इंग्रजींत ' एन्सायक्लोपीडिक डिक्शनरी ' असेंहि म्हणतात.

**ज्ञानकोशाचें मूल्यमापन**—वर उल्लेखिलेल्या प्रकारांनुसार ज्ञानकोशाची व्याप्ती ध्यानांत घ्यावी लागेल. पण बहुशः ज्ञानकोशाचे बाबतींत अति व्याप्तीचा आरोप करतां येणार नाहीं, कारण ज्ञान, हें निराकार, अनंत व अमर्याद असतें. जुनें ज्ञान त्याज्य होत नाहीं. नवें तर हवेंच असतें. जुन्यांतून नवें जन्म घेतें. जुन्या शोधांतून नवे शोध स्फुरतात. नवें अधिक चांगलें कदाचित ठरेल तरी त्यामागें जुन्याची प्रेरणा नि पुण्याई असतेच. बर्नार्ड शॉनें शेक्स्पिअरच्या संदर्भांत असें म्हटलें आहे कीं, " पूर्वी झालेल्या शेक्स्पिअर विषयक सगळ्या वाङ्मयाचा उपयोग केल्यानेंच मला इतकं चांगलं लिहिता आलं. " ज्ञानकोशाच्या रचनेंत जें जें ज्ञान येतें त्या त्या विषयीहि हें सार्थ ठरेल. त्याची रचना त्याचा उपयोग करूं म्हणणाऱ्यांना सर्वसुगम वाटणारी असली पाहिजे. प्रत्येक लेख साधार नि बिनचूक हवा. त्यांत विद्वत्तेचें अवडंबर वा अहंकार नसावा. त्याच्या वाचकांना त्यातलें विवेचन पटणारें नि पृच्छा वृत्ती करणारें वाटलें पाहिजे. मतभिन्नता असूं शकणाऱ्या प्रश्नाबाबतचें विवेचनहि एकांगी नि पक्षपाती असता कामा नये. अशा सर्व मुद्यांचें प्रतिपादन केवळ समतोल व संपूर्ण माहिती देण्याच्या दृष्टिकोनाचेंच असलें पाहिजे. ग्रंथसूचीच्या उत्कृष्टपणाचें वर्गीकृतपणा हें बंधन ज्ञानकोशाबाबत नाहीं. ज्ञानकोशाला अक्षर वारीचें मात्र अपरिवर्तनीय बंधन आहे. स्थूल विषय अक्षरवारीनेंच घेतलेले असले पाहिजेत. आणि अशा ज्ञानकोशाच्या शेवटीं सर्व स्थूल व सूक्ष्म विषयांची संपूर्ण उल्लेखसूची देण्यांत आली पाहिजे. अलिकडे चित्रें, नकाशे, अभ्याससूचीहि साक्षेपानें देण्यांत येतात. त्यासंगी वाचकाभ्यासकांना अभ्याससूचींचा अमूल्य उपयोग होतो. बालांकरतां तयार होणाऱ्या ज्ञानकोशामध्यें चित्रें असली तर बालांना ते कल्पनातीत आकर्षक होतात. अनेकखंडी ज्ञानकोशाच्या प्रत्येक खंडावर त्या खंडांतला पहिला व शेवटचा असे जे विषय असतील त्यांचीं नांवें ठळकपणे दिलेलीं असलीं पाहिजेत. तीं ध्यानांत घेणें

अवश्य नि सोईचें असतें. त्यामुळेंच हवा तो नेमका खंड उचलता येतो. ज्ञानकोश व असे संदर्भ ग्रंथ वारंवार खरेदी करतां येत नाहींत. मात्र ते वारंवार हाताळले जातात. या दृष्टीनें छपाई, बांधणी, कागद व शिवण हीं सर्व चांगल्या प्रकारचें नि टिकाऊ असलीं पाहिजेत. चित्रें योग्य आकाराची नि मूळ ग्रंथाला घट्ट धरून राहणाऱ्या मजबूत बांधणीची पाहिजेत. ज्ञानकोशाच्या रचनेचें मूळ उद्दिष्ट म्हणजे लोकाना ज्ञान देणें. हें सतत साधण्याचें दृष्टीनें पुरवण्या निघणें अत्यावश्यक आहे. कारण एकदा ज्ञानकोश जेथें पुरा होतो तेथें तो खरोखरीं केव्हांच पुरा होऊं शकत नाहीं. सर्वच विषयांच्या ज्ञान माहितींत सतत नवी नवी भर पडत असते. मनोविकास, ज्ञानसंवर्धन, विचार विनिमय वैगुण्याची जाणीव हें होण्याकरितां ज्ञानकोश व त्याच्या पुरवण्या हें अप्रतिम साधन आहे. पुरवण्या न मिळाल्या तर हा ग्रंथराज पुराण जरी नाहीं तरी अपुरा ठरेल हें निसंशय.

**मराठी भाषेतील ज्ञानकोश** — "ज्ञानकोशरचनेची कल्पना प्रथम मुंबईच्या 'उपयुक्त ज्ञानप्रसारक सभे 'त निघाली. १८५६ सालीं झालेल्या वार्षिक समारंभामध्यें रा. गोविंद नारायणजी यांनीं एक भाषण करून...डॉ. भाऊ दाजी,... रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलिक इत्यादि सभासदांच्या साह्यानें सभेनें एक 'सर्वसंग्रह' तयार करतांना अशी सूचना केली. पुढें काय झालें, हें कळत नाहीं." असा उल्लेख आढळतो (१) ज्ञानकोशाचें स्वरूप दिसलें सन १८६८ मध्यें. गायकवाड सरकारचे आश्रित रा. रावजी केशव सांभारे यांनीं 'विद्याकल्पतरू' नामक याच स्वरूपाचें नियतकालिक दोन तीन वर्षे चालविलें. (२) १८७८ मध्यें सुरू केलेला रा. जनार्दन हरी आठल्ये यांचा 'विद्यामाला' मासिक हा दुसरा प्रयत्न. पण तें मासिकहि फार काळ टिकलें नाहीं. (३) यानंतरचा उल्लेखनीय असा एक ग्रंथरूप प्रयत्न झाला. खानापूरचे दत्तात्रय गोविंद सडेकर यांनीं आपला 'सर्वसंग्रह' प्रथम १८९० मध्यें प्रसिद्ध केला. त्याच्या पुढें सुधारून वाढविलेल्या आवृत्त्याहि प्रसिद्ध झाल्या. (४) यानंतरचा आपणा सर्वांना चांगला माहिती असलेला व सुसंघटित उपक्रम 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश मंडळ' या डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या संस्थेचा. डॉ. केतकर, य. रा. दाते, चिं. ग. कर्वे, बापटशास्त्री वगैरे विद्वानांनीं रचलेला 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' याचे एकूण तेवीस खंड आहेत. हा आतां दुर्मिळ झाला आहे. याची आवृत्ति वा पुरवणी निघूं शकली नाहीं. १९१६ ते १९२७ असें बारा वर्षे हें काम चालू होतें. मराठीतील एक अपूर्व, प्रचंड संदर्भग्रंथ या दृष्टीनें याचें महत्त्व फार आहे. कोश निर्मितीचें काम किती बिकट नि किचकट असतें याची कल्पना डॉ. केतकरांनी लिहिलेल्या "माझे बारा वर्षांचें काम ऊर्फ ज्ञानकोश मंडळाचा इतिहास" यावरून येतो. ज्ञानकोश १९२७ मध्यें पुरा झाल्यानंतरच्या गेल्या ३०–३५ वर्षांच्या कालक्रमांत पुरवणी निघूं शकलेली नाहीं. निघण्याची गरज निर्विवाद होती.

इंग्रजी ज्ञानकोश " एन्सायक्लोपिडिआ ब्रिटानिकाचें पहिल्या आवृत्तीचें काम १७६८ ते १७७१ चे सुमारास झालें. १९३८ पासून त्याला सातत्यानें पुरवण्या निघाल्या आहेत. अगदीं नुकतीच १९६० मधील अशी पुरवणी आहे. या प्रत्येक पुरवणीमध्यें आधींच्या पुरवणीपुढच्या विश्वज्ञानविकासांतील प्रकरणें साक्षेपानें जोडलेली आहेत. तें काम प्रचंड नि अखंड आहे. त्यामागें फार मोठा राजाश्रय नि लोकाश्रय आहे. भारतांत नि महाराष्ट्रात हा आश्रय अर्थातच त्या तुलनेनें देशकालवर्तमानानुर आजवर नाममात्रच म्हटला पाहिजे. आश्रयाअभावीं असलीं कामें उभींच होत नाहीत. झालीं तर खोळंबतात. शिवाय मूळारंभीचे कार्यकर्ते त्याच कार्यात टिकून राहूं शकतात, असें नाहीं. या मूळच्या कार्यकर्त्यांच्या अनुभवाचा विचार करणारे नवे नवे होतकरू त्या कार्यांत येऊ असें म्हणत नाहींत. यामुळें 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचा' अद्वितीय प्रयत्न पहिल्या आवृत्तीनेंच थांबला. (५) यानंतर कोल्हापूरचे गणेश रंगो भिडे यांनीं पाच भागांचा ' व्यवहारिक ज्ञानकोश ' चित्रें इत्यादि देऊन सुबक छपाई कागद व बांधणीनें काढला. (६) भिडे यांनीच ' बालकोश ' काढण्यास सुरवात केली. पण त्याचा दुसरा भाग निघाला नाही. ( ७ ) ज्ञानकोशाचाच बहुशः संक्षेप असा 'सुलभ विश्वकोश' य. रा. दाते व चिं. ग. कर्वे यांनी सहा भागाचा संपादलेला आहे. १९४० पूर्वीच्या व्यावहारिक ज्ञानकोशात अनेक स्थळीं अधिक व नवीन माहिती आहे. पण १९५१ मध्ये पूर्ण झालेल्या सुलभ विश्वकोशांत असें काम दिसत नाहीं. ( ८ ) अलिकडे श्रीधर शामराव हणमते यांनीं केवळ संख्यात्मक संकेतांचाच एक ज्ञानकोश संपादून प्रसिद्ध केलेला आहे. ( ९ ) असाच संख्यात्मक संकेत व अन्य व्यावहारिक माहिती याचा एक कोश सन १९३० मध्ये वि. वि. जोशी व दि. वा. वैद्य यांनीं ' मुलांचा व्यवहारकोश ' या नांवानें परंतु प्रौढ अभ्यासकासहि उपयुक्त असणारा लिहिलेला आहे.

महाराष्ट्रीय ज्ञानकोश आता दुर्मिळ झाल्यानें व त्यानंतरच्या काळांत अखिल विश्वामध्यें असंख्यविध ज्ञान मानवापुढे आलेलें असल्यानें अगदीं अद्ययावत् असा आणि ' ज्ञानकोश ' या नावाला साजेल असा ' विश्वकोश ' सरकारच्या मदतीनें व वाईच्या प्राज्ञ पाठशाळेचे लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या नेतृत्वानें निघतो आहे. समर्थ नेतृत्व व सरकारी साह्य या बळावर हें कार्य होणें ही अत्यंत महत्त्वाची व आपल्या प्रदेशांतील जागृतीची एक निशाणी आहे. हें कार्य नीट यथासकल्प पुरें होऊन ग्रथालयें व ग्रंथपाल यांस लौकरच मिळो !

बालोपयोगी ज्ञानकोश म्हणून पुढील पुस्तकांचा निर्देश केला पाहिजे. ( १ ) वा. गो. आपटे यांचा मुलांचा विविध ज्ञानसंग्रह, ( २ ) वि. न. गोंधळेकर यांचें मुलांचें व्यावहारिक ज्ञान व सामान्य माहिती, ( ३ ) का. ना. भिडे यांची सामान्यज्ञानदीपिका व ( ४ ) रा. त्र्यं. रानडेकृत बहुरंगी करमणूक हीं पुस्तकें

विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें महत्वाचीं आहेत. रचनेच्या तंत्राचा काटेकोर विचार न ठेवला तर या पुस्तकांस मुलांचे ज्ञानकोश म्हणतां येईल. निरनिराळ्या विषयांची मुलांना स्थूल मानानें ओळख होऊन तीं बहुश्रुत व व्यवहारचतुर व्हावीं हा शिक्षण-शास्त्राचा हेतु या पुस्तकांमुळें साधतो.

ज्ञानकोश विषयवारहि असतात नि हवेत. मराठींत थोडथोडे होत आहेत. त्यांचीं शक्य तेवढीं उदाहरणें विषयवार संदर्भग्रंथ या प्रकरणांत दिली आहेत. येथें समजुतीपुरतीं पुढील उदाहरणें दिलीं आहेत. अगदीं कोशरचनेच्या तंत्राबरहुकूम जरी नसलीं तरी ज्ञानकोशाचा जो एकमेव हेतु कीं विषयाचें शक्य तेवढें सर्वांगीण ज्ञान देणें तो अशा ग्रंथांचें योगें साध्य होतो. (१) द. चिं. मुजुमदार यांचा दहा भागांचा 'व्यायाम ज्ञानकोश', (२) चिं. ल. मुळे यांचें चारखंडी पुस्तक 'माझें आवडतें पुस्तक अथवा गृहिणीजीवन सर्वस्व' भाग १ ते ४ (३) धों. भा. गोंधळेकर यांचा 'शैक्षणिक संक्षित कोश' व (४) र. भा. गोडबोलेकृत 'भरत खंडाचा अर्वाचीन कोश' आणि 'भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश' हीं दोन स्थळें नि व्यक्ति यांची माहिती देणारीं पुस्तकें, नमुना म्हणून पहावीं.

**नमुन्यांची इंग्रजी उदाहरणें**—(१) एन्सायक्लोपीडिया अमेरिकाना–३० खंड, न्यूयॉर्क. अमेरिकी ज्ञानकोशामधला अग्रगण्य ज्ञानकोश. पहिली आवृत्ति १८२९ ते १८३३ मध्यें तेरा खंडांची प्रसिद्ध झाली. नवीन पुरवण्यांमध्यें सर्व माहिती अद्ययावत् करून दिली जाते. आणि नवीन माहिती कोणती दिली आहे त्याबाबत संपादकीय निवेदनांत योग्य तपशिलासह सर्व निर्देश देण्यांत येतो. विज्ञानें, उद्योग, राजकारण, व्यापार इत्यादि जीवनसंबंधित विषय आहेत. ग्रंथांचें सार, गीतांचे शब्द, उत्तम चित्रें असल्यानें हा परिपूर्ण वाटतो.

(२) एन्सायक्लोपीडिआ ब्रिटानिका. आवृत्ति १५–२४ खंड व पुरवण्या लंडन. इंग्रजी भाषेतला सर्वांत जुना व असंख्य जनांना चांगला ज्ञात असलेला हा ज्ञानकोश होय. १७६८ ते ७१ हा प्रथम प्रसिद्ध झाला. हा ब्रिटिश राष्ट्राचा नि दृष्टिकोनाचा असला तरी त्याची ख्याती आंतरराष्ट्रीय आहे. महत्त्वाच्या लेखांच्या लेखकांची नांवें प्रत्येक खंडाच्या आरंभीं दिलेलीं आढळतात. विषय संपल्यावर उपयुक्त अभ्याससूची दिलेल्या आहेत. योग्य तेथें चित्रें, नकाशे, रेखाकृति आहेत. नकाशांतील स्थळांचा सूचींत उल्लेख आहे. विस्तृत प्रमाणांत अन्य संदर्भ आहेत. २४ व्या खंडांत अति विस्तृत सूची दिलेली आहे. याची १५ वी आवृत्ति निघाल्यानंतर १९३८ पासून प्रतिवर्षी पुरवणी प्रसिद्ध केली जाते व ती मध्यें त्या त्या काळापर्यंतच्या विश्वज्ञानविकासाची अद्ययावत् माहिती देऊन हा कोश तारीखवारायता ताजा ठेवण्याचा सातत्यानें प्रयत्न चालू आहे. याची सोळावी आवृत्ति १९६१ सालीं प्रसिद्ध झाली आहे. (३) कोलंबिया एन्सायक्लोपीडिआ–१ खंड,

संपा० ब्रिजवॉटर व शेरवूड, न्यूयॉर्क. एकखंडी ज्ञानकोशांमधला अत्यंत उपयोगी ज्ञानकोश. यांत सुमारें सत्तर हजार लहान लेख अक्षरवारीनें दिलेले आहेत. अनेक लेखाच्या शेवटीं निवडक अभ्याससूची दिलेल्या आहेत. (४) चेंबर्स एन्सायक्लोपीडिआ—१५ खंड. हा प्रथम १८८८ ते १८९२ मध्यें प्रसिद्ध झाला. बहुतेक सर्व ब्रिटिश ग्रंथालयामध्यें असतो. कारण कांहीं विषयांची माहिती ब्रिटानिकाहून सरस आहे. १९५० मध्यें अलिकडील नवीन आवृत्ति आढळते. (५) न्यू इंटरनॅशनल एन्सायक्लोपीडिआ—आवृत्ति २—२३ खंड. पुरवणी २ खंड. न्यूयॉर्क १९३०. यात भरपूर चरित्रें, अनेक चित्रें, विशेषनामाचें उच्चार दिलेले असल्यानें याची उपयुक्तता वाढली आहे. (६) पीअर्स एन्सायक्लोपीडिआ—आवृत्ती ३९. १९३१ पानें १०५४ पीअर्स साबण कारखान्याच्या या ज्ञानकोशांत शब्दकोश, चरित्रें, व्यवसाय, भूगोल, इतिहास इत्यादि अनेक विषयांची माहिती दिलेली आहे. अगदीं अलीकडे याची नवीन आवृत्ति निघाली आहे.

**मुलांकरितां इंग्रजींतील नमुने**—(१) ऑक्स्फर्ड ज्युनियर एन्सायक्लोपीडिआ व (२) कॉम्प्टन्स पिक्चर्ड एन्सायक्लोपीडिआ हे दोन अनेक खंडी कोश उपयुक्त आहेत. (३) गोल्डन एन्सायक्लोपीडिआ हा एक खंडी आहे. इंग्रजीत असे अनेक एकाहून एक सरस असे मुलांचे ज्ञानकोश तयार झालेले आढळतात.

**इंग्रजींतील विषयवार ज्ञानकोश**—या प्रकारचे शेकडो ज्ञानकोश इंग्रजींत झालेले आहेत. त्यांची शक्य तशी उदाहरणें विषयवार संदर्भ ग्रंथ या प्रकरणांत आहेत. येथे समजुती पुरतीं पुढील उदाहरणें देतों. (१) सायंटिफिक एन्सायक्लोपीडिआ. १२ खंड, (२) एन्सायक्लोपीडिआ ऑफ रिलिजन ॲंड ईथिक्स १३ खंड, (३) एन्सायक्लोपीडिआ ऑफ सोशल सायन्सेस १५ खंड.

**कालिकें**—रोज किंवा आठवड्यानें किंवा पंधरवड्यानें किंवा महिन्यानें प्रकाशित होणाऱ्या दैनिकें, साप्ताहिकें इत्यादि नियतकालाच्या प्रकाशनाना कालिकें म्हणतात. सर्व लोकांना व शासकांना देशस्थितीचें ज्ञान देणें, पक्षाच्या मतांचा प्रसार करणें, सर्वसामान्याना नवनव्या सनसनाटी वार्ताविहारांत रमविणें हें काम वृत्तपत्रें करतात. मासिकें अनेक विषयांची मनोरंजक शैलींत सुरस नि सुबोध माहिती पुरवितात. आज वृत्तपत्रांतील माहिती हा जीवनाचा एक अभिन्न व आवश्यक भाग झाला आहे. आपापल्या परीने वृत्तपत्रें विविध माहिती देत आहेत. जीवनात आवश्यक वाटणारे अनेक प्रकारचे संदर्भ रोज पानें भरभरून पुरविणाऱ्या वृत्तपत्रांची व त्यांच्या वाचकांची संख्याहि झपाट्यानें वाढत आहे. सकाळीं पत्रविक्रेत्याची ललकारी ज्याप्रमाणें आपणास झोपेंतून जाग आणते त्याप्रमाणेंच नवीन वैज्ञानिक, औद्योगिक, कलाविषयक, साहित्यविषयक, धार्मिक, सामाजिक, राजकीय घडामोडींसंबंधीं रोजच्या नव्या बातम्या आपणास जागृति देतात नि आपली

आपोआप प्रगति होत जाते. अगणित प्रकारच्या वृत्त शोधार्थ वाचक दारींवारीनें ग्रंथालयांत जमत असतात. अग्रलेख, अभिप्राय, चित्रें, चुटके, कायद्या खटल्याच्या, विक्रीच्या मालाच्या–विविध व्याख्यानादि कार्यक्रमांच्या या चित्रपटनाटकांच्या जाहिराती, दूर ठिकाणांची बातमीपत्रें, वाचकांच्या तक्रारी या सूचना, आगगाड्या आगबोटी– मोटारी इत्यादींची वेळापत्रकें अशा अनेक गोष्टींची माहिती वाचक-अभ्यासकांना हवी असते. याविषयींचे अद्ययावत् संदर्भ वृत्तपत्रांतून मिळतात. वाचकांना हवे असतात. ग्रंथपालांकडून ते पुरविले गेले पाहिजेत. अनेक कालिकांची कांहीं वैशिष्ट्यें असतात. उदाहरणार्थ रविवारच्या अंकामध्यें अनेक वृत्तपत्रें बालां-साठीं व बालांनीं लिहिलेले साहित्य तसेंच क्रीडावृत्त देतात. सोमवारच्या अंकामध्यें कोणी भविष्य देतात. मंगळवारच्या अंकांत कोणी अन्य पत्रांमध्यें प्रसिद्ध झालेल्या विशेष लेखाचें सार देतात. बुधवारच्या अंकांत कोणी परदेशांमधील वार्तापत्रें देतात. गुरूवारच्या अंकांत कांहीं पत्रांमध्यें वैद्यकीय उपचारांची माहिती देण्यांत येते. योजक चालकाच्या खानावळींत प्रतिदिवशीं कोणते पदार्थ करावयाचे याचा आराखडा ठरविलेला आढळतो. तसेंच अनेक वृत्तपत्रें करतात. या वैशिष्ट्यपूर्ण सदरांची माहिती ग्रंथपालांनीं आपल्या स्मृतिपथावर छायावृक्षांप्रमाणें–पाणपोईप्रमाणें ठायीं ठायीं सिद्ध ठेवलेली असली पाहिजे. क्षणांत काढून देण्यासारखी करामीं ठेवली पाहिजे.

**ग्रंथालयाची जबाबदारी**—पुस्तकें कांहीं ना कांहीं कालावधीनें तयार होत असतात. परंतु नियतकालानुसार म्हणजेच तुलनेने अगदीं लौकर कालिकांचे अंक प्रसिद्ध होत असतात. म्हणून त्यांमधून सतत ताजी माहिती प्रसृत होत असते. विज्ञानें, वैज्ञानिक प्रयोग व शोध, रासायनिक उद्योग, राजकारण, अर्थशास्त्र या विषयींचे नवनवे वारे कालिकांच्या अंकाद्वारें वहात येत असतात. ताज्यांत ताज्या पुस्तकाहूनहि ताजी माहिती अर्थातच कालिकामध्येंच मिळते. याकरतां अनेक वाचक ताज्या अंकाकडे लक्ष लावून असतात. कालिकांमधला कित्येक प्रकारचा मजकूर अनेकदां पुस्तकरूपांत कधींच प्रसिद्ध होऊं शकत नाहीं. कारण त्याचें सर्वसामान्य म्हणजेच बहुसंख्य वाचकांना महत्व नसेल. परंतु त्या माहितीचा गरज कोणीतरी केव्हांतरी उभा राहिल्न. जुन्या काळांतील परिस्थिति, विचारसमजुती, चालीरीती यांवर नंतरच्या काळांत लिखाण केलें जातें. अशा लिखाणाचा दृष्टिकोन अलिकडचा बहुधा असतो. तत्कालिन परिस्थिति नेमकी समजून घेण्याची अनेक वाचकांना गरज वाटते. कारण या वाचकाभ्यासकांना किंवा त्या लेखकांना ती जुन्या काळांतली परिस्थिति प्रत्यक्ष अनुभवास आलेली नसते. आजच्या घडीला ' सुदाम्याचे पोहे ' हातीं घेणारास त्या काळीं तशी परिस्थिति, विचारसमजुती, रीती-भाती खरोखरीच होती कीं तो श्रीपाद कृष्णांचा कल्पनाविलास आहे तें यथार्थतेनें करून घ्यायचें असेल तर तत्कालीन लग्नसमारंभ, चैत्रागौरी, मगळागौरी, श्रावणी,

गणेशोत्सव, शिमगा, खेड्यामधलीं तत्कालीन 'वॉटरवर्क्स' म्हणजे विहिरी, त्या उन्हाळ्यांत आटूं लागल्यावर तेथें होणारीं रणकंदनें इत्यादींची माहिती तत्कालीन वृत्तपत्रांमधील ताज्या खबरींवरूनच घेतली पाहिजे. आणि याकरता सर्वसामान्य ग्रंथालयामध्यें किमान तरी कांहीं महत्त्वाची परप्रांतीय व शक्य तीं सर्व स्थानिक कालिकें जपून ठेवलीं जावीं. ग्रंथसंग्रहालयें म्हणूनच जीं स्थापन झालीं आहेत तेथें तर कालिकांच्या संग्रहाच्या रक्षणाविषयीं कटाक्ष हवा. वृत्तपत्रांचे जुने अंक अन्यथा पुन्हा कधींहि मिळत नाहींत. त्या त्या पत्राच्या कचेरीमध्येंहि जुने अंक नियमानें ठेवले जातात वा पाहूं देतात असें नाहीं. फक्त पुण्याच्या केसरीनें ही सोय व ग्रंथालयहि ठेवलें आहे व या सोयीचा लाभ असंख्य जनांनीं घेतलेला आहे. ही सोय अन्य कोठेंहि दिसत नसल्यानें संग्रहालयें म्हणूनच जीं स्थापन झालीं आहेत अशा मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत व पुण्याच्या मुक्तद्वार महाराष्ट्र ग्रंथालयात ती सोय झाली पाहिजे आणि निरंतर कायम राखली गेली पाहिजे. या ग्रंथालयामध्यें सर्व कालिकांचे अंक सोईस्कर जाडीचे बांधून घेण्यांत यावे. ते संरक्षिले जावे. त्यांच्या देवघेवीबाबतहि सक्त बंधन नि नियम हवेत. हे बांधीव अंक कधींहि बाहेर दिले जाऊं नयेत. ज्ञानाच्या प्रगतीचे व विश्वाच्या सर्वांगीण इतिहासाचे टप्पे या कालिकामध्यें चिरस्थायी झालेले असतात. त्या त्या कार्यक्रमांतली ताज्यातली ताजी माहिती नव्या नव्या अंकांमध्यें येते. अगणित वाचकाभ्यासकांना त्या माहितीचें अतिशय महत्त्व वाटतें. ते अंक पुनरलभ्य असल्यानें त्यांची जपणूक केली पाहिजे.

**मासिकें, त्रैमासिकें इत्यादि**—कांहीं थोडीं मासिकें एकएकाच विषयाला वाहिलेलीं असतात. कांहींमध्यें अनेक विषयांची माहिती येते. त्या सर्वांचे विशेष, विवेचनांतील खोली, भाषेंतील आकर्षकता यांचा परिचय असला पाहिजे. आपली शेती, आरोग्य मंदिर, उद्यम, मुद्रणप्रकाश, व्यायाम, समाजस्वास्थ्य, सृष्टिज्ञान, हीं मासिकें विज्ञानें आणि व्यवसाय यांचा परामर्ष घेणारी म्हणून प्रसिद्धी पावलीं. कथासागर, सत्यकथा, साहित्य पत्रिका यांचा कल ललितवाङ्मय व भाषा यांचेकडे आहे. आनंद, खेळगडी, चांदोबा, प्राथमिक शिक्षण, मुलांचें मासिक, शालापत्रक, शिक्षण ही बालरंजन व शिक्षण यांच्या आघाडीवरचीं म्हणून प्रसिद्ध झालीं. भारत इतिहास संशोधक मंडळाचें त्रैमासिक इतिहासाला वाहिलेलें आहे. तर 'ग्रंथपाल' व 'साहित्य सहकार' हीं ग्रंथपालांचीं मासिकें स्थिर होत आहेत. अमृत, किर्लोस्कर, चित्रमयजगत्, प्रसाद, रोहिणी, वसंत, वाङ्मयशोभा ही मासिकें अनेक विषयांचा परामर्ष घेणारीं म्हणून मान्यता पावलीं आहेत.

**कालिकांतील लेखांची सारसूची**—कालिकांमधील लेखांची सारसूची तयार होऊन प्रसिद्ध होणें अत्यंत महत्त्वाचें आहे. मराठींत बिनचूक नि शास्त्रपूत

सारसूची तयार होऊं लागलेली नाहीं. एवढेंच काय, अनेक मासिकें आपल्या अन्य वैशिष्ट्यांच्या भरांत अनुक्रमणिका सुद्धा न देणें किंवा अपुरीच देणें हेंच वैशिष्ट्य मानतात व तें चुकीनें वैशिष्ट्य थांबवा असें सुचविलें तरीहि, चालूच ठेवतात. अनुक्रमणिका हवीच. तशीच सूचीहि हवी. तशी ती तयार होऊं लागली तर कल्पनातीत उपयुक्त ठरेल. महाराष्ट्र ग्रंथालय संघाच्या 'साहित्य सहकार' मध्यें लेखसूची हें एक सदर आहे. तें अगदीं नियमित होणें अवश्य आहे. त्याचप्रमाणें त्यांत एकूण एक कालिकांचें हे काम केलें जावें. त्यासाठीं अंकांची धनेंहि वांटविण्यांत यावीं. कालिकांमधील लेखांची साधी सूची किंवा चांगला अभ्यास करून केलेली सारसूची हें साधन दुर्दैवी सारखें आहे. जिच्या परिमित पानामध्यें विविध माहितीचा अपरिमित परिच् सामावतो. मराठी ग्रंथालयांच्या वाचकांसाठीं ग्रंथसूचीकार शं. ग. दाते हे गेल्या पाऊण शतकांतील लेखांची बृहत्सार सूची तयार करीत आहेत. ती तयार झाल्यावर त्यांच्या मराठी ग्रंथ सूची सारखेंच एक अपार महत्त्वाचें व चिरंजीव साधन उपलब्ध होईल.

**कालिकांसंबंधींचे संदर्भग्रंथ** — भारतामधील सर्व भाषांत प्रसिद्ध होणाऱ्या कालिकांची माहिती देणारा 'निफॉर गाइड टु इंडियन पीरिऑडिकल्स' हा ग्रंथ पुण्याहून प्रसिद्ध झालेला आहे. रा. गो. कानडे यांचें त्रुटित माहिती देणारें 'मराठी नियतकालिकांचा इतिहास' हें १८३२ ते १९३७ या विषयाची माहिती देणारें पहिलें पुस्तक म्हणून व वि. कृ. जोशी आणि रा. के. लेले यांचें 'वृत्तपत्रांचा इतिहास १७८०–१८८० हें एक उल्लेखनीय पुस्तक म्हणून नमूद केलीं पाहिजेत. इंग्रजींत विषयवार कालिकांची व विषयवार सारसूचीची अनेक संदर्भ पुस्तकें उपलब्ध आहेत. 'पूल्स इंडेक्स टु पीरिऑडिकल लिटरेचर,' 'रीडर्स गाइड टु पीरिऑडिकल लिटरेचर,' 'ॲन्युअल मॅगझीन सब्जेक्ट इंडेक्स,' 'ॲग्रिकल्चरल इंडेक्स,' 'केमिकल ॲब्स्ट्रॅक्ट्स,' 'बायॉलॉजिकल ॲब्स्ट्रॅक्ट्स,' 'आर्ट इंडेक्स,' 'एज्युकेशन इंडेक्स' इत्यादि बहुतेक सर्व विषयांच्या कालिकांची अंतर्बाह्य माहिती देणारें अनेक जुने व चालू संदर्भग्रंथ आहेत. संशोधन कार्यांत व संशोधन संस्थांत ह्या प्रकारच्या संदर्भ साधनांचा बहुमोल उपयोग होतो. इंग्रजीवाचनीयांच्या विस्तृत ग्राहक क्षेत्रामुळें असे संदर्भ ग्रंथ संख्येनें विपुल आहेत आणि ते दीर्घ काळापासून निर्माण होत आले आहेत. मराठींत व्हावयास हवे आहेत. त्यांच्या अभावीं संदर्भसाह्याचें काम खोळंबतें. प्रत्येक ग्रंथालयानें निदान आपल्या पुरती तरी शक्य तेवढी अशी सूची तयार केली पाहिजे. ती अत्युपयुक्त होईल.

**संदर्भसाह्यांत कात्रणें व फायलींचा उपयोग** — कालिकांशीं संलग्न पण थोडीशी निराळ्या स्वरूपाची एक गोष्ट संदर्भसाह्याच्या दृष्टीनें लक्षांत घेतली पाहिजे. रोजच्या रोज वृत्तपत्रांमध्यें रकानेच्या रकाने भरून येणाऱ्या विविध मज-

कुराचें महत्त्व पावसाळ्यांत आपल्या महाराष्ट्रांतील पश्चिमवाहिनी नद्यांना जें पुराचें पाणी येतें त्यासारखेंच आहे. तें पाणी साठवितां आलें तर खोपोली–भिवपुरी–भिऱ्यासारखीं आणखी विद्युत् गृहें उभारता येतील. वीज केवढी लोकोपयोगी आहे हें मुद्दाम सांगावयास नको. अगदीं त्याप्रमाणेंच या बहुविध मजकुराचें आहे. या वृत्तविशेषांमधील अनेक गोष्टी अनेकदा विलक्षण प्रकारें उपयोगी पडतात. या दृष्टीनें शक्य ते वृत्तविशेष संग्रहिणें व त्यांची जंत्री ठेवणें इष्ट आहे. शक्य तरीं हीं कात्रणें काढून त्यांचें चिकट पुस्तक करण्यांत यावें किंवा फायलींमध्यें तीं ठेवावीं. व्यक्तींचीं वा स्थळाचीं चित्रें–छाया चित्रें, स्थानिक इतिहास घडविणाऱ्या घटनांचीं वृत्तें इत्यादींचा हा संग्रह होईल. हा संग्रह न ठेवला तर किती एक प्रकारची उपयुक्त माहिती, चित्रें इत्यादि रूपांत भावी काळांत नेमकें काम भागविणारी ठरेल ती पार लुप्त होऊन जाईल. पण तीच संग्रहीत केली तर ती मधून ज्ञानकोश, चरित्रकोश, सांवत्सरिकें, माहितीपुस्तकें यांसारखे अनेक अत्युपयुक्त संदर्भ ग्रंथ तयार करण्याची सामुग्री नेमकी मिळेल. अशा प्रकारची विषयवार कात्रणें पुरविण्याचें महत्त्वाचें कार्य ना. तु. ठाकूर याची पर्सनल प्रेस सर्व्हिस, शनिवार पेठ, पुणें २ ही संस्था करते.

**कालिकाप्रमाणेंच प्रासंगिक पुस्तिका**—अनेकदां अशा प्रासंगिक पुस्तिका, ठरायिक कालक्रमानें नाहीं पण अधून मधून प्रसिद्ध होणारी मालिकें (म्हणजे सीरीयल्स) अनेक ठिकाणांहून ग्रंथालयामध्यें येतात. पुस्तकांपेक्षा वेगळी माहितीहि यांमध्यें आढळते. ती उपयुक्त म्हणूनच संग्राह्य असते. योग्य समयीं योग्य तो उपयोग होण्यासाठीं यांची नेमकी माहिती देणारी सूची वा जंत्री ठेवणे इष्ट आहे. हीं प्रकाशनें केव्हां कायम संग्राह्य असतात. जी संग्राह्य असतील तीं सुलभ ठेवावीं. बाकीचीं निरुपयोगी वाटलीं तर बाद करावीं.

**चरित्रकोश व चरित्रें**— चरित्र म्हणजे माणसाच्या जीवनाची गोष्ट. ग्रंथालयांत ग्रंथपाल म्हणून बसल्यावर, ज्याला जी हवी ती माहिती काढून देण्यासाठीं बसल्यावर अमका कोण होता किंवा आहे, त्यानें विशेष ध्यानांत घेण्याजोगें असें काय केलें किंवा त्याच्या बाबतीत काय घडलें, केव्हांसें तें घडलें इत्यादि माहिती द्यावी लागते. म्हणून अनेकांची चरित्रें प्रत्येक ग्रंथपालानें परिचित करून ठेवणें अवश्य आहे. कोणत्या वेळीं कोणाची जन्मतिथि किंवा पुण्यतिथि विचारली जाईल त्याचा नेम नाहीं. तसेंच ती व्यक्ति या किंवा मागच्याच शतकांतली म्हणजे तुलनेनें अगदीं नजीकच्या काळांतलीच असेल असेंहि नाहीं. ती व्यक्ती म्हणजे कोणी लोकोत्तर पुढारीच असला पाहिजे असेंहि नाहीं. एक नवीनच उदाहरण द्यायचें तर कांगोच्या लुमुंबाचेंच देता येईल. तितकासा मुळींच किंवा कधींच पूर्वी ज्ञात नसलेल्या या पुरुषाचें चरित्र त्याच्या रहस्यमय निधनामुळे जाणून घ्यावेंसें जगांत सर्वत्र वाटूं लागलें. वृत्तपत्रीय ग्रंथपालाला लुमुंबाची ही माहिती शोधून काढून व घणाघाईनें

पुरवून देणें म्हणजे कसोटीच. माहिती केवळ व्यक्तीचीच, आपल्या येथील व्यक्तीचीच, सर्व सामान्य व्यवसायांतील व्यक्तीचीच असेल असेंहि नाहीं. कोणाच्या शोधाची, कोणाच्या काव्याची, कोणाच्या नाटकाच्या पहिल्या प्रयोगाची किंबहुना पहिल्या प्रियेची वा पहिल्या अपत्याचीहि माहिती कोणाला हवीशी वाटेल. कोणीहि लेखक, शोधक, गायक, व्युत्पत्तिज्ञ, प्रवासी, राज्य कमाविणारा वा गमाविणारा, धनिक वा धनहर्ता, भट या वाग्भट, कु. केळेकर वा वसईच्या राजेळ्या केळ्याचा प्रख्यात बागवान—ज्यांचे योगें अखिल विश्वाच्या माहिती भांडारांत मूठ चिमूटभर भर पडेल त्याची माहिती मागितली जाईल. ती दर प्रयत्नानें द्यावी लागेल. आणि त्यासाठी तत्काल काम भागविणारीं पुस्तकें सुपरिचित असलीं पाहिजेत.

**कसोट्या, प्रकार व स्थानव्यवस्था**—चरित्रकोशाचे संपादक वा प्रकाशक यांचा पूर्वानुभव व हेतु यांचा चरित्रविषयक संदर्भांचे वेळीं प्रथम विचार केला पाहिजे. असा ग्रंथ केवळ सत्य माहिती देण्याच्या निर्भेळ हेतूनेंच रचलेला आहे की द्रव्यार्जनाच्या हेतूनें एखाद्या धंदेवाइक संस्थेनें रचला आहे हें पहावें लागतें. कांहीं ग्रंथाच्या बाबतींत संदर्भविषयक व्यक्ती जिवंत आहे वा दिवंगत आहे हें पाहून त्याप्रमाणें अमका कोण आहे या अमका कोण होता हें सांगणारे ' हू इज हू ' या ' हू वॉज हू ' यापैकीं नेमका ग्रंथ उचलला पाहिजे. संमेलनासाठीं अध्यक्ष म्हणून कोणा सुप्रसिद्ध नेत्यांस निमंत्रिलें तर त्याच्या ओळखीसाठीं ' हू वॉज हू ' पाहून पुरणार नाहीं. माधव ज्यूलियनांच्या पुण्यतिथीच्यासमयीं त्यांच्या विषयींची माहिती ' हू इज हू ' मध्ये मिळणार नाहीं. कांहीं ग्रंथ फक्त एक चरित्र देणारे असतात, तर कांहीं मध्यें अनेकांचीं चरित्रें असतात. अनेकदां असेंहि दिसतें कीं चरित्रसंग्रह अक्षरवारीच्या रचनेचा असतोच असें नाहीं. म्हणूनच तो ' चरित्रकोश ' नसतो. म्हणून जे संदर्भ ग्रंथ संकीर्ण, संदर्भ विभागांत ठेवण्यांत येतात ते अक्षरवारीच्या रचनेने असतात. चरित्रकोशांचे ठोकळ मानानें तीन प्रकार आहेत. राष्ट्रीय, जागतिक व व्यावसायिक. हे सार्वदेशिक या सार्वकालिक असूं शकतात. एकाच देशांतल्या व्यक्तींप्रमाणें एखाद्या कालखंडांतल्या व्यक्तींची चरित्रें देणारे असतात. एकाच विषयाशीं ज्यांचें नांव संलग्न झालेलें आहे अथवा एकाच व्यवसायांत ज्यांचें नांव विख्यात होतें अशांची चरित्रें, चरित्रसंग्रह वा चरित्र कोश त्या त्या विषयांमध्येंच ठेवणें उपयुक्त असतें. उदाहरणार्थ, ललित लेखकांचीं चरित्रें ललित वाङ्मयाच्या विभागांतच ठेवणें योग्य होईल. अर्थात् मोव व गरज यांचा विचार करून तीं संकीर्ण संदर्भ विभागांतहि ठेवावीं लागतील. या कोशांचा, संग्रहांचा व चरित्रग्रंथांचा उल्लेख करणारीं पत्रें ग्रंथालयाच्या सूचीमध्यें करून ठेवावीं लागतात. संदर्भासाठीं त्या पत्रांचा व त्यामध्यें उल्लेखिलेल्या पुस्तकांचा हुकमी उपयोग होतो.

**मराठी भाषेंतील चरित्रकोश, संग्रह इत्यादि** — (१) मराठींतील नांव घेण्याजोगा पहिला प्रयत्न म्हणून र. मा. गोडबोले यांचे 'भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश' व 'भरत खंडाच्या अर्वाचीन कोश' यांचा उल्लेख केलाच पाहिजे. यांत व्यक्तींची माहिती दिलेली आहे. मराठी वाङ्मयाच्या आरंभकाळ या दृष्टीनें हे कोश म्हणजे अपूर्व होत. (२) यानंतरचा विस्तृत प्रमाणावर सुरू केलेला 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक' हा गं. दे. खानोलकर यांचा, अनंततनय ते मर्ढेकर म्हणजे अद्यापीहि अपूर्ण असलेल्या महत्त्वाचा उद्योग होय. तो अत्यंत परिश्रमपूर्वक, आधारपूर्ण नि साह्यकर व्हावा या ध्येयानें ते पुरा करीत आहेत. (३) अलिकडचा सि. वि. चित्रावशास्त्री यांचा तीन भागात प्रसिद्ध केलेला चरित्रकोश सुप्रसिद्ध आहे. 'भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोश' या ग्रंथामध्यें श्रुति, स्मृति, पुराणें, सूत्रें आणि वेदांगें यांत उल्लेखिलेल्या व्यक्तींची एकत्रित माहिती दिली आहे. या सुमारें १२०० चरित्रांचे आधार तेथल्या तेथेंच दिलेले आहेत. संस्कृताची अक्षरवारी आहे. एकाच नांवाच्या अनेक व्यक्तींची माहिति द्यावी लागली तेथें ती कालक्रमानें देण्याचा प्रयत्न ठेवला आहे. कालनिर्णय, पौराणिक भूगोल व विद्यमान जग इत्यादींसंबंधीं सहा परिशिष्टें जोडलेलीं आहेत. 'भारतवर्षीय मध्ययुगीन चरित्रकोश' या ग्रंथामध्यें चंद्रगुप्तकालापासून पेशवाईच्या अंतकालापर्यंत म्हणजे खिस्तपूर्व ३२१ ते १८१८ पावेतोंच्या व्यक्तींची माहिती दिली .आहे. जात, प्रांत, धर्म, वर्णविरहित भावनेनें सर्व माहिती गोळा करून दिलेली आहे. अनेक वंशावेलहि दिलेले आहेत. 'भारतवर्षीय अर्वाचीन चरित्रकोश' यामध्यें १८१८ ते १९४५ अखेरच्या काळांत बहुविध क्षेत्रांत झळकलेल्या व्यक्तींची माहिती दिली आहे. जात, प्रांत, धर्म, वर्ण, देश, भाषा, धंदा, हुद्दा विरहित भावनेनें ज्यांची ज्यांची भारतांत भलीबुरी कशींहि कामगिरी झाली व तीमुळें ज्यांचें ज्यांचें नांव भारतेतिहासात नमूद झालें त्या त्या व्यक्तींची माहिती गोळा करून दिलेली आहे. जो जो कर्मानें भारताशीं निगडित आहे तो तो जन्मानें अन्यदेशीय असला तरीहि येथें समाविष्ट केलेला आहे. मराठींतील हा विशेष महत्त्वाचा प्रयत्न आहे. पहिला भाग प्रसिद्ध झाल्याला तीस व तिसरा प्रसिद्ध झाल्याला सोळा वर्षे होऊन गेली. आतां याला नव्यानें पुरवणी तयार केली तर याची उपयुक्तता कल्पनातीत वाढणार आहे. चित्रशाळेनें प्रकाशिलेले चरित्रगुच्छ, भा. र. ठकारकृत हैद्राबादमहाजनपरिचय, विज्ञानबोध हा कोशस्वरूप ग्रंथांतील चरित्रखंड इत्यादींचा चरित्रविषयक माहिती देतांना मोठा उपयोग होतो. आगरकर, हरिभाऊ आपटे, महात्मा गांधी, गणपतराव चोडस, श्री. म. माटे, पंडिता रमाबाई, बॅ. सावरकर अशांची चरित्रें या आत्मचरित्रें त्या त्या काळाची व विषयाची उत्तम माहिती देतात.

## मराठींतील कांहीं उपयुक्त व निवडक चरित्र संग्रह

अमीन (न. अ.) — आजमाल्चे प्रसिद्ध हिंदी मुसलमान. १९४३–४५.
आजगांवकर (ज. र.) — महाराष्ट्र कविचरित्र. ६ भाग.
,, महाराष्ट्र संतकवयित्री. १९३९
ॲबट (ए. ए.) — महिला रत्नमाला. ४ खंड. १९३३–३५
गाडगीळ (सरस्वतीबाई) — पुष्पगुच्छ. ६ खंड १९२५–२९.
गोखले (पु. पा.) — दक्षिण महाराष्ट्रांतील साहित्यिकांची सूची. १९४३.
चव्हाण (चि. गो.) — महाराष्ट्र रत्नमाला १८०० ते १९००. १९३५.
चित्राव (सि. चि.) — भारतवर्षीय प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन कोश. ३ खंड १९३२–४६.

जबलपूर महाराष्ट्रीय परिचय १ व २. १९४१.
ठकार (भा. र.) — संस्थानपरिचय अर्थात् मराठवाडा व्यक्ति आणि वाङ्मय परिचय पूर्वार्ध व उत्तरार्ध १९४३.
,, हैद्राबाद महाजन परिचय. १९३४.
दडवते (ग. रं.) — मराठी स्त्री लेखिकांची सूची. १८७३ ते १९२१. १९२१.
पाटील (बा. भु.) — ऐतिहासिक जैनवीर अर्थात् अहिंसा धैर्याचें सत्यस्वरूप. १९३४.
पाठक (वि. मा.) — दीपस्तंभ १९४९.
बापट (सरोजिनी) — भारतीय स्त्री रत्नें–४ खंड. १९४८–४९.
भट (यशोदाबाई) — आर्य स्त्रीरत्नें. आ. २–१९३२.
,, ऐतिहासिक स्त्रीरत्नें आ. २. १९२४.
मगदूम (आ. भा.) — जैनवीर कथा. १९३९.
मुजुमदार (म. ग.) — प्रभुरत्नमाला (कायस्थ चरित्र माला) १८९६.
मोडे (दि. स.) — ऐतिहासिक स्त्रिया. आ. २–१९३१.
वाकसकर (वि. स.) अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रें. १९२५.
शर्मा (ग. रा.) — सारस्वत रत्नमाला (सारस्वत ज्ञातीयांचीं चरित्रें) १९१०.

नमुन्याचीं इंग्रजी उदाहरणें—(१) चेंबर्स बायॉग्राफिकल डिक्शनरी दि ग्रेट ऑफ ऑल नेशन्स ॲंड ऑल टाइम्स (२) डी. एन्. बी. म्हणजे डिक्शनरी ऑफ नॅशनल बायॉग्राफी. १८८५ ते १९४०. ६६ खंड व पुरवण्या. अमेरिकेंत वसाहत करणारे, आयरिश, ब्रिटिश अशांची २५००० वर चरित्रें आहेत. (३) नॅशनल एन्सायक्लोपीडिआ ऑफ अमेरिकन बायॉग्राफी. २४ खंड. पुरवणी. सूची

(४) दि इंटरनॅशनल हूजहू (५) युनिव्हर्सल प्रोनाउन्सिंग डिक्शनरी ऑफ बायॉग्राफी अँड मायथॉलॉजी. (६) अलिकडे दिल्लीहून साहित्य अकादमीने 'हूजहू ऑफ इंडियन रायटर्स' प्रसिद्ध केला आहे.

'हूजहू' व 'हूवॉझहू' हे अमुक व्यक्ती कोण आहे या होती हे सांगणारे कोश प्रत्येक देशाचे आहेत. दर वर्षी तयार होणाऱ्या सांवत्सरिकामध्ये त्या त्या मुदतीच्या नव्या पुरवण्या समाविष्ट केल्या जातात. मोठ्या व्याप्तीचा चरित्रकोश एकदा प्रसिद्ध झाल्यावर त्यानंतरच्या काळाकरता 'हूजहू' व 'हू वॉज हू' यांची गरज निर्माण होते. कारण अवश्य ती भर घालून चरित्रकोश ग्रंथांच्या नव्या आवृत्त्या निघणे ही क्वचितची गोष्ट आहे.

**नमुन्यापुरते इंग्रजीतील विषयवार चरित्रकोश** — (१) अमेरिकन मेन ऑफ सायन्स. (२) लीडर्स इन एज्युकेशन. (३) डॉडकृत पार्लमेंटरी कंपॅनिअन.

**वार्षिके : पंचांगे, माहिती पुस्तके, परिचय ग्रंथ, सांवत्सरिके** — प्रतिवर्षी प्रसिद्ध केल्या जाणाऱ्या एका ठराविक प्रदेशाची, व्यवसायाची या विषयाची सर्वांगीण माहिती देणाऱ्या प्रकाशनांना वार्षिके म्हणतात. एका अर्थाने ही प्रकाशने म्हणजे ज्ञानकोशच. अर्थात् ज्ञानकोशाची रचना अक्षरवारीने असते. वार्षिकांत ती तशी नसते. पण ज्ञानकोशांत जशी सर्व विषयांची माहिती असते तशीच माहिती सांवत्सरिके, परिचयग्रंथ, पंचांगे यांमध्ये त्यांच्या स्वीकृत विषयव्याप्तीनुसार सर्व अंगोपांगांची दिली जाते. विविध प्रदेश, व्यवसाय वा विषय यांच्या क्षेत्रांमध्ये दरवर्षी असंख्यविध घटना घडतात. त्यांची माहिती विचारली जाते. त्या त्या क्षेत्रांतील आदल्या वर्षाची प्रगति, पूरक आकडेवारी, तक्ते इत्यादींचे साह्याने समालोचन करणारे अनेक ग्रंथ, यीअरबुक ह्या संज्ञेचे इंग्रजींत निघतात. मराठींत श्री. म. माटे यांच्या नेतृत्वाने 'सांवत्सरिक' या अभिधानाने तीन वर्षे महाराष्ट्रविषयक यीअरबुके निघाली. पंचांग म्हणजे दिवस, नक्षत्रें यांचेशी संबंधित माहिती देणारी पुस्तके. यांमध्ये सबंध वर्षभरांतील महिनावार दिवसांची बहुविध माहिती दिलेली असते. ती बरोबरच देशादेशाच्या परंपरागत रीतीप्रमाणे धार्मिक, सामाजिक ऋतुमानांशी संबंधित माहिती, सार्वजनिक महत्त्वाचे जयंत्यापुण्यतिथ्यासारखे दिवस इत्यादि माहिती दिली जाते. इंग्रजींत यास आल्मनाक म्हणतात. डिरेक्टरीला परिचयग्रंथ किंवा माहितीपुस्तक म्हणावे. परिचयग्रंथात त्याच्या व्याप्तीमधील विषयाच्या जंत्र्या दिलेल्या असतात. उदाहरणार्थ दूरभाषकांची म्हणजे टेलीफोनची जंत्री, आगगाड्या–आगबोटी–एस. टी. गाड्या इत्यादींची वेळापत्रके यांमध्ये त्या त्या विषयानुसार जंत्र्या व माहिती दिलेली असते. वेळापत्रकांचा कालक्रम वर्षाचा नसतो.

**मूल्यमापन** — प्रत्येक वार्षिकाच्या मुखपृष्ठावर जें वर्ष छापलेलें दिसतें त्याच्या आदल्या वर्षाची माहिती त्यांत असते. प्रकाशनघातत्य ही एक महत्त्वाची कसोटी आहे. वेळापत्रकांसारखीं कांहीं माहितीपुस्तकें वर्षभराहून कमी कालमानानें प्रकाशित होत असतात. त्यांची ती मुदत प्रथम ध्यानांत घ्यावी लागते. सरकारी वा बिनसरकारी संस्था, प्रांत व शहरें, लोकसंख्या, विज्ञानविकास, उद्योगधंदे, भौगोलिक व ऐतिहासिक माहिती, वाङ्मयीन व शैक्षणिक प्रगति, पिकें व खनिजें यांचें उत्पादन, व्यापार, इत्यादींची जी जी माहिती दिली जाते ती ती साधार असणें अवश्य आहे. तशींच त्या त्या विषयांत महत्त्व पावलेल्या व्यक्तींची माहितीहि या ग्रंथांमध्ये असली पाहिजे. त्या सर्व गोष्टी आधीं तपासून ठेवल्या पाहिजेत. ५५२१९

**मराठींतील सांवत्सरिक** — दरसाल घडणाऱ्या विविध गोष्टींचा ज्यामध्यें एकत्रितपणें परामर्श घेतला आहे असे सांवत्सरिक कोश पाश्चात्य देशांत कितीतरी निघतात. त्यांचा सर्वांना फार उपयोग होतो. मतप्रदर्शन न करता नुसती जगांतील किंवा राष्ट्रांतील सर्व व्यवहार क्षेत्रांतील साधार माहिती देणें हें अशा वार्षिकाचें उद्दिष्ट असतें. अशाच धर्तीचें सांवत्सरिक मराठींतहि असावें या स्तुत्य हेतूनें महाराष्ट्रांतील सामाजिक चळवळींचे नेते व सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. म. माटे यांच्याच नेतृत्यानें व चिकाटीनें महाराष्ट्र सांवत्सरिक मंडळ निघून १९३३ सालीं सुमारें १००० पृष्ठांचा ग्रंथ बाहेर पडला व १९३४ आणि १९३५ सालीं त्या त्या वर्षाचे पुरवणी अंकहि निघाले. दरसाल त्या (त्या आदल्या) सालापुरता व पांच वर्षांनीं विस्तृत संकलितस्वरूपाचा सांवत्सरिक ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें या मंडळानें योजिलें होतें. पण माला मागणी कमी व खर्च जास्त. तेव्हां ही योजना पुढें चालू राहिली नाहीं. सरकार, धनिक संस्था किंवा संपूर्ण सरकारी पुरस्कार यांचे करवींच असें कार्य होऊं शकेल.

**नमुन्याचे इंग्रजी ग्रंथ** — इंग्रजींत बहुतेक सर्व विषय व व्यवसाय यांचीं परिचय पुस्तकें, सांवत्सरिकें व जंत्र्या आहेत. तेथील बहुतेक प्रत्येकास टेलिफोन डिरेक्टरी म्हणजे दूरभाषक जंत्री अखंड लागते. तें एक उत्तम संदर्भसाधन आहे. तिकडे आगगाड्या, आगबोटी व विमानें यांचींहि वेळापत्रकें निघत असतात. सर्व वेळापत्रकांचें एकत्रित पुस्तकहि निघतें. अर्थात् हीं पुस्तकें वर्षभराहून कमी मुदतींचीं असतात. त्यांचा तेथें सतत उपयोग केला जातो.

**(१) इन्फर्मेशन प्लीज आल्मनाक** — आदल्या वर्षातील डिसेंबर ते नोव्हेंबर या बारा महिन्याच्या काळामधील अमेरिकेंतील संस्था, व्यक्ती, अर्थव्यवस्था दिनविशेषदर्शिका, राष्ट्रीय पारितोषकें, क्रीडासमालोचन, राजकीय वा सामाजिक महत्त्वाच्या घटना अशा महत्त्वाच्या सदरांमध्ये विविध माहिती देण्यांत येते. ही सर्व

माहिती सुलभ होण्यासाठीं उपयुक्त सूची दिली जाते. (२) दि वर्ल्ड आल्मनाक अँड यीअरबुक ऑफ फॅक्टस (३) व्हिटॅकर्स आल्मनाक- ही झालीं आल्मनाक ग्रंथांची उदाहरणें- (१) दि कॅबिनेट, फर्नीशिंग अँड अपूहोल्स्ट्री ट्रेडस् डिरेक्टरी (२) दि डिरेक्टरी ऑफ मर्चंटस्, मॅन्युफॅक्चरर्स अँड शिपर्स ऑफ दि वर्ल्ड (३) दि बिल्डिंग ट्रेडस् डिरेक्टरी- ही विषयवार वार्षिक परिचय ग्रंथांचीं उदाहरणें होत- (१) दि यीअरबुक ऑफ दि युनायटेड नेशन्स, (२) दि स्टेटस्मेन्स यीअरबुक, (३) इंडिआ—ए रेफन्स ॲन्युअल हीं संकीर्ण सांवत्सरिकांची व (१) ए यीअर बुक ऑफ एज्युकेशन, लंडन व (२) यीअर्स वर्क इन लायब्रेरियनशिप हीं विषयवार सांवत्सरिकांची उदाहरणें होत. आपल्या येथें (१) दि टाइम्स ऑफ इंडिया डिरेक्टरी व (२) थॅकर्स इंडियन डिरेक्टरी ऑफ इंडिया ॲंड पाकिस्तान हीं दोन इंग्रजी आणि (३) पुण्याची पॅरामाउंट उद्योग—व्यापारदर्शिका ह्या परिचयग्रंथांचीं नांवें सांगण्यासारखी आहेत.

**समग्रग्रंथ, सारग्रंथ, गौरवग्रंथ**—संपूर्ण आगरकर, न. चिं. केळकर समग्र वाङ्मय, कोल्हटकर लेखसंग्रह, अच्युत बळवंत कोल्हटकर स्मारकग्रंथ, ना. गो. चापेकरांचे निवडक लेख, काळांतील निवडक निबंध, सावरकरसाहित्य, मोर संस्थान रहिवाश्यांचें 'साहित्यतोरण,' नाशिकचें 'प्रदक्षिणा,' पुण्याच्या अभिनव शारदोपासक मंडळाचा 'शारदाविहार', गोडे—पोतदार—माटे, बडोद्याचे माणिकराव, श्रीमंत राजेसाहेब सांगली, अशांचे गौरवग्रंथ अशा स्वरूपाचे समग्र वा गौरव वा सारग्रंथ संदर्भशोधांत फार साह्यकर होतात. अशा ग्रंथांतील विषयांचें ज्ञानकोशांतील विषयांशीं साम्य असतें. पण रचना वेगळी असते. म्हणजे अक्षरवार असत नाहीं आणि विविधता असली तरी संपूर्णता नसते. अगणित विषयांचें अभ्यासपूर्ण विवेचन यांमध्यें आढळतें. यांमधील सर्व विषयांची व लेखकांची संपूर्ण सूची प्रत्येक ग्रंथाचे शेवटीं असावी. नसेल तर प्रत्येक ग्रंथालयानें शक्य तेवढी तयार केली पाहिजे. ती अतिशय उपयुक्त ठरेल. मराठींत अशा उल्लेखसूची (म्हणजे इंडेक्स) तुरळकच तयार होत आहेत. पण डोळस अभ्यासक नि निरलस संदर्भसाह्यक यांच्या कामामुळें तिची उपयुक्तता नि अटळ गरज सर्वांस पटेल. मराठी ग्रंथसूचीकार शं. ग. दाते यांच्या सूचीचें खरें मोल तीमधील संदर्भकोशाच्या अभावीं झालें नसतें. ह्या ग्रंथसूचीचा संदर्भकोशाचा भाग बाजूला ठेवून एकदा पहा आणि नंतर एकदा तो हातीं घेऊन पहा. उल्लेखसूचीची किंमत एकदम कळेल. मराठींतले अनेक उत्तम ग्रंथ उल्लेखसूचीच्या अभावीं पडून रहातात. याउलट इंग्रजींतील सर्व महत्वाच्या ग्रंथांच्या शेवटीं उल्लेखसूची हटकून असतेच आणि तिचा उपयोग तत्काळ ध्यानात येतो. संदर्भसाधनांपैकीं हा संकीर्ण भाग उल्लेखसूची तयार करून कामीं लावला पाहिजे.

## भूगोल

भूगोल विषयक संदर्भ शोधकार्मी भूगोल कोश म्हणजे गॅझेटियर्स व नकाशा संग्रह हे दोन प्रकारचे ग्रंथ विशेष उपयोगी पडतात. भूगोलकोश म्हणजे संबंध जगामधील किंवा जगाच्या एखाद्या भागामधील विशिष्ट प्रदेश, स्थळें, पर्वत, नद्या रस्ते इत्यादींची माहिती देणारे ग्रंथ. ही माहिती भौगोलिक नांवाच्या अक्षरवारीनें देण्यांत येते. तिला जोडून नकाशेहि देण्यांत येतात. ग्रंथरचना पद्धतशीर व परिपूर्ण असेल तर प्रत्येक स्थळ दाखवणाऱ्या नकाशाचा क्रमांक व नकाशांतील स्थानहि निर्दिष्ट केलें जातें. परिचय ग्रंथांमधून (म्हणजे डिरेक्टरीमधून), इतिहासविषयक ग्रंथांमधून, स्थलवर्णनाच्या किंवा प्रवासवर्णनाच्या ग्रंथामधून तसेंच सर्वसामान्य ज्ञानकोशांमध्येंहि नकाशे देतात. हे ग्रंथ व हे नकाशे यांचा निर्देश करणारें स्वतंत्र सूचिपत्र (म्हणजे कॅटलॉग कार्ड) ग्रंथालयाच्या सूचीमध्यें करून ठेवलें तर संदर्भ देतांना फार मोठी सोय होते.

### इंग्रजी संदर्भ ग्रंथ

इंपीरियल गॅझेटियर ऑफ इंडिया १ ते २६ खंड. १९०७.

कॅसल्स वर्ल्ड पिक्टोरिअल गॅझेटियर.

देव (नंदलाल) — जॉग्रॅफिकल डिक्शनरी ऑफ एन्शंट अँड मिडिव्हल इंडिया १९१९.

बार्थो लोमो (जे. जी.) — दि टाईम्स सर्व्हे ॲटलास ऑफ दि वर्ल्ड.
(यांत वांशिक, धार्मिक, राजकीय, व्यापारी, प्रादेशिक असे ११२ नकाशे अक्षांशरेखांशासहित दिलेले आहेत.)

चेम्बर्टर्स जॉग्रॅफिकल डिक्शनरी (ए डिक्शनरी ऑफ नेम्स अँड प्लेसिस विथ जॉग्रॅफिकल अँड हिस्टॉरिकल इन्फर्मेशन अँड प्रोनन्सिएशन्स.)

सेल्टझर (एल. ई.) — कोलंबिया लिपिंकॉटस गॅझेटियर ऑफ दि वर्ल्ड.
(जगांतील सर्वोत्कृष्ट स्थलवर्णन कोशापैकी एक. गांवें शहरें, बेटें, देश, पर्वत, नद्या, समुद्र, सरोवरें इत्यादींची वेचक व उपयुक्त माहिती. शहरांच्या व इतर महत्त्वाच्या स्थळांच्या बाबतीत लोकसंख्या, अक्षांश, रेखांश, समुद्रसपाटीपासूनची उंची, व्यापार, उद्योग, नैसर्गिक उत्पन्नें, सांस्कृतिक संस्था या संबंधीहि माहिती दिली आहे.)

### संदर्भोपयोगी मराठी साहित्य

कणगली (एस्. एस्.) — बृहत् पुण्याचा माहितगार. सचित्र १९५२.

काणेकर (अ. आ.) — आमची माती, आमचें आकाश. १९५०.

गोडबोले (र. भा.) — भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश (स्थलनामकोश) आ. २. १९२८.

जादूगार रघुवीर —– प्रवासी जादूगार १९५४.
,, —मी पाहिलेला रशिया १९५८.
जोशी (ग. वा.) इ.— श्रीक्षेत्र पंढरपूरदर्शन. आ. २. १९५९.
जोशी (महादेवशास्त्री) — तीर्थरूप महाराष्ट्र. २ भाग. आ. ३. १९५६.
,, — महाराष्ट्राची धारातीर्थे २ भाग १९५२ व १९५३.
पाध्ये (प्रभाकर) -- नवे जग, नवी क्षितिजें. १९५४.
फडके (गो. ह.) — माझी तीर्थ यात्रा, ४ भाग. १९२३ ते १९३१.
वोरा (दे. मो.) व कुळकर्णी (ल. का.) — अहमदनगर. डिस्ट्रिक्ट डिरेक्टरी. १९५१.
मराठे (ना. बा.) संपा० — कलकत्ता माहितगार १९५७.

## इतिहास

ज्ञानकोश, चरित्रकोश, परिचय ग्रंथ, व्यायाम ज्ञानकोश यांच्याप्रमाणेंच ऐतिहासिक घटनांचें वर्णन व विवरण करणारे ग्रंथ व नकाशे या स्वरूपाची साधनें अनेक संकीर्ण रूपांमध्ये उपलब्ध आहेत.

### इंग्रजी संदर्भ ग्रंथ—

एशियन रेकॉर्डर—आशिया व भारतांतील वृत्त. सुरुवात १९५५.
किसिंग्ज कॉंटेंपोरसी आर्काइव्हज् (जगांतील महत्वाच्या घडामोडींचें वृत्त). सुरुवात १९३९.
कॅंब्रिज ॲंशंट हिस्टरी. १२ खंड. १९२३.
,, मिडिव्हल ,, ८ खंड. १९११.
,, मॉडर्न ,, १४ खंड. १९१२.
,, हिस्टरी ऑफ ब्रिटिश इंडिया.
केलर (हेलन आर्.) — दि डिक्शनरी ऑफ डेटस्. २ खंड. १९३४.
पुटनॅम्स हॅंडबुक ऑफ युनिव्हर्सल हिस्टरी. १९२७.
,, हिस्टॉरिकल ॲटलॉस मिडिव्हल ॲंड मॉडर्न. आ. ६. १९२७.
बर्कस पिअरेज, बॅरोनेटेज ॲंड नाइटेज. आ. १०३. १९६३.

### संदर्भोपयोगी मराठी साहित्य

केळकर (य. न.) — ऐतिहासिक शब्दकोश. २ भाग. १९६१.
(मराठी इतिहास साधनांमध्यें जुनी भाषा व फारसी, मुसल्मानी, फिरंगी शब्द यांची गर्दी असते. त्या दृष्टीनें हा कोश अत्युपयुक्त आहे. सुमारें १५,००० शब्द. समानार्थी शब्द व संदर्भोपयोगी अस्सलांतली अवतरणें.)

गुप्ते (भा. म.) — हिंदी राज्यघटना. १९५१.
गोगटे (चिं. म.) — महाराष्ट्र देशांतील किल्ले. २ भा. १८९६ व १९०७.
गोडबोले (र. भा.) — भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश. आ. २. १९२८.
(प्राचीन भारतीय व्यक्ती व स्थळें यांचा वर्णनात्मक कोश.)
घराण्यांचे इतिहास — आंग्रे, आचवल, आपटे, कोल्हटकर, चिटणीस, गुप्ते, दाभाडे, पवार, भोसले, शिंदे इत्यादि.
जावडेकर (शं. द.) — आधुनिक भारत. आ. २. १९५३.
जोशी (प्र. न.) — दिनविशेष. १९५०.
नातू (रा. ना.) — जगाचा इतिहास. १९५६.
पै (द. त्र्यं.) — जळता गोमंतक. १९४८.
भारत सरकार — ऑल इंडिया सिव्हिल लिस्ट (प्रतिवर्षी प्रसिद्ध होते.)
भिडे (रा. गो.) — हिंदुमहासभेचा इतिहास. १९४३.
मराठे (द. श्री.) — जगाचा इतिहास. १९५६.
महाराष्ट्र सरकार — सिव्हिल लिस्ट (प्रतिवर्षी प्रसिद्ध होते.)
शिखरे (दा. न.) — नागपूर ते नागपूर. १९२० ते १९५९. (काँग्रेसच्या कार्याचें समालोचन.) १९५८.
स्वराज्य साप्ताहिक — भाषावार प्रांतरचना विशेषांक. १९५३.
हळप (वि. बा.) — काँग्रेसचा कल्पवृक्ष. १८८५ ते १९४८. १९४८.

## राज्यशास्त्र—इंग्रजी संदर्भ ग्रंथ

थीमर (वॉल्टर) — एन्सायक्लोपेडिआ ऑफ मॉडर्न वर्ल्ड पॉलिटिक्स. १९५०.
शामशास्त्री — अर्थशास्त्र पदसूची. इंडेक्स व्हर्बोरम् टु दि पब्लिश्ड टेक्स्टस् ऑफ अर्थशास्त्र (कौटिल्य). १९२४.
सेलिग्मन (आर्. ए.) — एन्सायक्लोपीडिया ऑफ सोशल सायन्सेस. १५ खंड. १९२९. (मानसशास्त्र, तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, शिक्षण, इतिहास, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, मानववंशशास्त्र, कायदा यांची माहिती. दीर्घ लेखांक. लेखकांची नांवें. अभ्यासंसूचि व समग्र उल्लेखसूचि. पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेच्या भागांत सामाजिक विचार आणि संस्था यांविषयींचे प्रदीर्घ प्रबंध.)

## संदर्भोपयोगी मराठी साहित्य

कोल्हटकर (श्री. य.) — राष्ट्रवाद. १९४१.
गाडगीळ (न. वि.) — राज्यकारभार विचार. १९५५.

गाडगीळ (पां. वा.) — अराज्यवाद. १९३९.
गोरे (ना. ग.) — साम्राज्यशाही. १९३९.
जावडेकर (शं. द.) — लोकशाही. आ. २. १९४९.
धर्माधिकारी (भाऊ) — पुंजीवाद, समाजवाद की ग्रामवाद ! १९४८.
शिरसीकर (व. मं.) — राज्यशास्त्र. आ. २. १९५९.

**अर्थशास्त्र-इंग्रजी संदर्भ ग्रंथ**

थँकर्स डिरेक्टरी ऑफ दि चीफ इंडस्ट्रीज ऑफ इंडिया, बर्मा अँड सिलोन.
पाल्ग्रेव्ह — डिक्शनरी ऑफ पोलिटीकल इकॉनॉमी. ३ खंड. १९२३.
पिक्सले (एफ्. डब्ल्यू.) — अकाउंटंटस् डिक्शनरी. ए कॉम्प्रिहेन्सिव्ह एन्सायक्लो-
पीडिआ अँड डिरेक्शन ऑन ऑल मॅटर्स. २ खंड. १९२०.
पोस्ट अँड टेलिग्राफ गाइड, इंडिया.
ब्राउनी (डब्ल्यू. आर्.) — व्हॉटस् व्हॉट इन् दि लेबर मुव्हमेंट. ए डिक्शनरी
ऑफ लेबर अफेअर्स अँड लेबर टर्मिनॉलॉजी. १९२१.
रिचमंड अँड शेरीफ — डिक्शनरी ऑफ लाइफ इंश्युरन्स. १९३०.
स्नेलिंग — डिक्शनरी ऑफ इन्कम टॅक्स अँड सर टॅक्स प्रॅक्टिस. आ. ८ वी.

**संदर्भोपयोगी मराठी साहित्य**

आपटे (ना. ह.) — व्यवसायपत्रें. १९४६.
उद्यम मासिक — औद्योगिक विकास विशेषांक. ऑगस्ट १९५०.
कामत (अ. रा.) — मार्क्सवादाचें एक शतक. कम्युनिस्ट पक्षाच्या विकासाचा
इतिहास. १८४८ ते १९४८.
काळे (वा. गो.) व काळे (श्री. वा.) — सहकार. १९४१.
गजेंद्रगडकर (के. बा.) — इन्कम टॅक्स प्रवेशिका अर्थात् इन्कम टॅक्स कायद्याची
मराठींत संक्षिप्त व सुबोध माहिती. १९४२.
गाडगीळ (न. वि.) — समाजशास्त्र. १९४४.
चापेकर (ना. गो.) — बदलापूर. १९३३.
जोग (चिं. वि.) — बँका व त्यांचे कारभार. १९४६.
जोशी (शं. त्रि.) — सभांचा कायदा व पद्धति. १९४४.
दामले (सी. के.) — सभा, अध्यक्ष व सभासद अर्थात् सभेतील कामें पद्धतशीर
कशीं चालवावीत ह्या विषयींच्या सविस्तर माहितीचें पुस्तक. १९२७.
नाईक (जे. पी.) — उद्यांचें कोल्हापूर. १९४४.
लिमये (के. जे.) — दि इंडियन रेडी रेकनर. नव्या पैशांत व्याज, पटाव व वेतन
इत्यादींचा हिशेब. १९५८.
हिंदी वस्तुभनार मंडळ — स्वदेशी उद्यमसूचिका. १९३३.

## समाजशास्त्र-इंग्रजी संदर्भ ग्रंथ

आरन (अँटी ए.) — टाइप्स ऑफ फोकटेल. ए क्लासिफिकेशन अँड बिब्लिऑग्राफी. १९२८.
एन्सायक्लोपीडिआ ऑफ इस्लाम. ५ खंड. १९१३.
ज्यूइश एन्सायक्लोपीडिआ. १२ खंड, १९११.
टांक (उमरावसिंग) — डिक्शनरी ऑफ जैन बायॉग्राफी. १९१७.
नॅशनल एन्सायक्लोपीडिआ ऑफ दि कलर्ड रेस. १९१९.
फेअर चाइल्ड (एच्. पी.) संपा. — डिक्शनरी ऑफ सोशिऑलॉजी.
बानर्जी (वीरेन) — डिक्शनरी ऑफ सुर्रिझम अँड मायथॉलॉजी. १९२७,
बार (जे. एच्.) — डिक्शनरी ऑफ सोशल एजन्सीज ऑफ न्यूयॉर्क. १९३५.
यंग (ई. एफ्.) — डिक्शनरी ऑफ सोशल वेल्फेअर.
सेलिग्मन — एन्सायक्लोपीडिआ ऑफ सोशल सायन्सेस. १५ खंड. १९२९.
स्टॅंडर्ड एन्सायक्लोपीडिआ ऑफ दि अल्कोहोल प्रॉब्लेम. ३ खंड. १९२४.
स्टीव्हन्स (डेनिस) — ए हिस्टरी ऑफ साँग.
हमर्टन (जे. ए.) — पीपल्स ऑफ ऑल नेशन्स, देअर लाइफ टु डे अँड दि स्टोरी ऑफ देअर पास्ट. ७ खंड. १९२२–२४.

## संदर्भोपयोगी मराठी साहित्य

अत्रे (त्रि. ना.) — गांवगाडा. आ. ३. १९५९.
आठल्ये (वि. वा.) — कऱ्हाडे ब्राम्हणाचा इतिहास. १९४७.
ऋग्वेदी (म्ह. वा. मं. दुभाषी) — आर्यांच्या सणांचा इतिहास. संक्षित आवृत्ति. १९४२.
करंदीकर (ज. स.) व जोशी (शं. ना.) — चित्तपावन समाजचित्र. १९४०.
" — हिंदुत्ववाद. १९४१.
कालेलकर (गो. मं.) — मुंबई इलाख्यांतील जाती. १९२८.
कालेलकर (द. बा.) — जिवंत व्रतोत्सव. (अनु. भाऊ धर्माधिकारी) आ. २, १९४७.
केतकर (ग. वि.) — हिंदुत्वाची राष्ट्रीय मीमांसा. १९४९.
गुडेकर (बाळा) प्रका. — कुंभश्र मार्गदर्शक. १९४१.
गुळवणे (वा. रा) — ब्राम्हणसभेची गेलीं साठ वर्षे. १९४०
चापेकर (ना. गो.) — चित्पावन. १९३८.
चित्राव (ति. वि.) — देशस्थ ऋग्वेदी ब्राम्हण परिचय ग्रं
जोगळेकर (स. आ.) — महाराष्ट्र [illegible] सह्याद्रि. १९५६

जोशी ( महादेवशास्त्री ) — कर्नाटक. १९६१.
,, — केरळ. १९६०.
,, — गुजरात. १९६२.
,, — तामिळनाड. १९६०.
,, — संस्कृतीचीं प्रतीकें. १९५७.
नारगोळकर ( कुसुम ) व नारगोळकर ( वसंत ) — जंगलचे राजे. १९५५.
बावर ( सरोजिनी ) — मराठींतील स्त्रीधन. १९५६.
भागवत ( दुर्गा ) — लोकसाहित्याची रूपरेषा. १९५६.
भाटे ( श्री. म. ) — अस्पृश्यांचा प्रश्न. १९३३.
मुळे ( चिं. ल. ) — माझें आवडतें पुस्तक अथवा गृहिणी जीवन सर्वस्व. ३ भाग. १९३३.
रांगणेकर ( सौ. कुमुदिनी ) — भारतीय सण व उत्सव–चैत्र ते फाल्गुन. १२ भाग. १९५७.
लांडे ( दो. बा ) — हिंदुस्थानांतील मेंढपाळ लोक. १९४५.
सहस्रबुद्धे ( द. ल. ) — आपली खेडीं. १९५०.
सावरकर ( वि. दा. ) — सावरकरांचे जातिभेदोच्छेदक निबंध. १९५०.
स्वराज्य साताहिक — गुन्हेगारी विशेषांक.

## कायदा–इंग्रजी संदर्भ ग्रंथ

घोष ( ललित मोहन ) — ज्युडिशियल इंटरप्रिटेशन ऑफ टर्म्स अँड लॉज ऑफ ब्रिटिश इंडिया. २ खंड. १९१७.
देसाईज ऑल इंडिया पॉइंट नोटेड इंडेक्स ऑफ केसिस. १९२७.
मॉर्टन ( जॉन ब्रूस ) — सिलेक्शन ऑफ लीडिंग केसिस ऑन दि हिंदू लॉ ऑफ इन्हेरिटन्स.
व्हॅलेंटाइन ( जे. ए ) — लॉ डिक्शनरी विद्य प्रोनन्सिएशन्स. १९३०.
सप्रू ( तेजबहादूर ) — एन्सायक्लोपीडिआ ऑफ दि जनरल अॅक्टस अँड कोडस् ऑफ इंडिया. १९३५.

## संदर्भोपयोगी मराठी साहित्य

केळकर ( का. न. ) व खरे ( बाळूताई अनंत ) — हिंदु व्यवहार धर्मशास्त्र अर्थात् प्राचीन धर्मशास्त्र, प्रचलित हिंदु कायदा व सुधारणा यांचें विवेचन. १९३२.
जोशी ( म. पु. ) — न्यायवैद्यक, शवपरीक्षा, मृत्यूचीं कारणें, बलात्कार, गर्भपात इ. विषयक कायदे. १९४४.
रानडे ( रा. के. ) — तुमचा वकील. सर्वसामान्य माणसासाठीं कायद्याचें पुस्तक. १९५०.

## विषय समारोप

**विषय विस्ताराचा हेतु**—संदर्भसाह्य म्हणजे काय, त्याचा हेतु कोणता, त्याची तयारी कशी करावी, तें देतांना घडणाऱ्या कृतींच्या गतीनुसार कोणते दोन प्रकार ठरले आहेत, संदर्भग्रंथ म्हणजे कोणते, संदर्भोपयोगी अन्य साहित्य कोणते इत्यादि माहिती आतांपर्यंत पाहिली. मराठींत हा विषय अद्यापीहि नवाच आहे. ग्रंथालयामध्येंच व ग्रंथालयविषयक काम करणारांच्या अनुभवामधूनच ग्रंथपालन या विषयाच्या अंगोपांगांची माहिती क्रमानें पुढें येत आहे. ग्रंथपालनविषयक सिद्ध रीतींनीं कांहीं प्रमाणांत तरी काम करीत असणाऱ्या ग्रंथालयामध्यें, ग्रंथालय हें सर्व परींची माहिती देणारें केंद्र आहे या सत्याचा प्रत्यय उत्तरोत्तर अधिकाधिक येत आहे. ग्रंथपालांच्या ग्रहण–स्मरण, बुद्धि–कृतींप्रमाणें ग्रंथालयांमध्यें विविध माहितीच्या तलाशात येणाऱ्या वाचकाभ्यासकांना माहिती मिळूं लागली आहे. अनेक प्रकारची सिद्ध माहिती शोधून–विचारून पुरविली जाते. ही माहिती कशी घ्यायची व द्यायची हा या पुस्तकाचा विषय–त्यासाठीं हा विस्तार झाला.

**आजचीं संदर्भसाह्य साधनें**—या कामीं कांहीं सिद्धग्रंथ व अनेक अन्य सामान्य ग्रंथहि उपयोगाचे लागतात. मराठीमध्यें ग्रंथसूची, ज्ञानकोश, चरित्रकोश, व्यावसायिक परिचयपुस्तकें, शब्दकोश, स्थलवर्णनकोश असे कांहीं सिद्धग्रंथ आहेत. खूप होण्यास वाव आहे. इंग्रजींत असे असंख्य ग्रंथ आहेत. त्यांची नमुन्यासाठीं उदाहरणें या पुस्तकांत मुद्दाम दिली आहेत. मराठी ग्रंथालयामध्यें त्यामधले अनेक ग्रंथ शक्यता व इष्टता यांच्या प्रमाणांत खरीदून ठेवले पाहिजेत. अशा असंख्यविध ग्रंथविशेषांची कल्पना यावी, नमुन्यासाठींच्या उदाहरणांवरून आपली तसे ग्रंथ पहावेसे वाटावे, एवढेंच नव्हे तर मराठीत तसे ग्रंथ रचण्याची कोणास इच्छा व्हावी हा हेतु इंग्रजी ग्रंथांच्या याद्या देण्यामागे आहे. इंग्रजींतून अभ्यास करणारांच्या संख्येनुसार इंग्रजींत असे सुचिरकालिक ग्रंथ निर्माण झालेले आहेत. मराठी प्रदेश व मराठीचें ज्ञान इंग्रजीच्या तुलनेनें अति थोडें आहेत. त्या प्रमाणांतच मराठींत अशा प्रकारची ग्रंथनिष्पत्ति होऊं शकेल.

**संदर्भगरजू व नियम**—संदर्भ शोध करणाऱ्या वाचकांस संदर्भ देताना कधीं एकच पुस्तक या साधन पुरे होईल, तर कधीं अनेक पुस्तकें व साधनें पहावीं लागतील. बहुतेक ग्रंथालयांच्या नियमावलीत दुर्मिळ व किंमती संदर्भ साधनें प्रत्येकी एक मागणीपत्र भरून घेऊन द्यावींत असा नियम असतो. पण कोणा संदर्भ गरजूस जर केवळ एकच नव्हे तर पंचवीस या पन्नासहि पुस्तकें पहावयाची असतील तर ती मागणी पत्रें देण्यांतच त्या वाचकांचा वेळ संपायचा. तेव्हां वाचावर्तीत ग्रंथपालनें आपल्या त्याच्या विश्वासाप्रमाणें काम करूं द्यावयास हरकत नाहीं. कपाटांशीं जरी

सर्वांनांच मुक्त प्रवेश देतां येणार नाहीं. तरी क्वचित् आपल्या विशेष माहितीच्या वाचकांना तो देणें सुरक्षित व सोईचें असेल तर घावयास हरकत नको. मागणी पत्रांच्या बाबतींतहि नियमाचा काटेकोरपणा असाच तारतम्याने पाळगावा. संदर्भ साधनांबाबत एका वेगळ्या प्रकारेंहि तत्पर राहिलें पाहिजे. संदर्भ सहाय्य देतांना माहिती अगदीं अद्ययावत् देतां यावी, यासाठीं सर्व संदर्भ साधनांचा नवेपणा, ताजेपणा कटाक्षानें सांभाळला पाहिजे. कांहीं पुस्तकांच्या नव्या आवृत्त्या निघतात. कांहीं विषयांवर अधिक अधिकृत व नवनवी माहिती प्रसिद्ध होत असते नी तीमुळें आधींची माहिती जुनी नि रद्दबाद होते. कांहीं पुस्तकें अतिवापरामुळें जीर्ण शीर्ण पानांचीं होऊन जातात व ती वापरण्याच्या अवस्थेंत उरत नाहींत. या सर्वांकडे ग्रंथपालानें सदैव अवधान ठेवलें पाहिजे आणि आपल्या संदर्भ विभाग जिवंत, गरज् संदर्भ शोधकांसाठी तयार नि तत्पर राखला पाहिजे. या करितांच सूचीचा ताजेपणाहि आठवणीनें सतत सांभाळला पाहिजे.

**संदर्भ साहाय्यक** — ग्रंथालयांतील देवघेवविभागाप्रमाणेंच संदर्भ विभाग हाहि एक महत्त्वाचा विभाग आहे. पण याची तितकीशी जाणीव आपल्या इकडील चालकांना वा वाचकांनाहि अद्यापि झालेली दिसत नाहीं. ग्रंथालयांत ग्रंथपालन शिक्षित ग्रंथपालांकडून किती विविध प्रकारची माहिती मिळूं शकते हेंहि अद्यापि कोणाला पूर्णपणें कळलेले नाहीं. तें समजावून सांगण्याचा प्रयत्नहि ग्रंथपालाकडून अजून सर्व प्रयत्नांनिशी झालेला नाहीं. अनुभवी व साहसील ग्रंथपालांकडून वाचकांना असंख्य प्रकारची हवी ती ती माहिती मिळते हें आपल्या ग्रंथालयामध्यें क्रमाक्रमानें समजून येत आहे. ग्रंथालयांची एकूण व्यवस्था जसजशी सुधारेल तसतशी या बाबतींतली वाचकांच्या विश्वासाची वाढ होत जाणार आहे. गरजू वाचकांना हवी ती माहिती काढून देणें हें काम कांहीं अगदीं एकसाचीच नाहीं. जागृत अनुभव, नवीन संदर्भ शोधकार्मी निरलसता, वाचकांना साह्य देण्यासाठीं मनाची प्रसन्नता या गोष्टी संदर्भ साहाय्यकाच्या ठायीं असल्या पाहिजेत. त्याच्या शासन संस्थेनें त्या त्याच्या ठायीं अखंड नि अवश्य राखल्या पाहिजेत. ग्रंथालयांतील अन्य कामामध्यें तोचतोचपणा म्हणजेच एकसाचेबंदपणा असतो. संदर्भ साह्य हें काम प्रेरक व रंजकहि असतें पण तें करण्यास साहाय्यकाचें मन प्रसन्न असलें पाहिजे. तशा प्रसन्न मनाचा संदर्भ सहाय्यक आपल्या ग्रंथालयाला हमखास माहिती देणारें, अगणित संदर्भ शोधकांच्या नित्य भेटीचें माहिती केंद्र बनवील, वाचकांच्या गरजांसंबंधी आडाखे तयार ठेवील व असंख्य तज्ज्ञांची दीम म्हणजे तात्कालिन संदर्भांची माहिती तो करतलांवर आणि जिव्हाग्रावर सिद्ध राखील. प्रत्यक्ष पुस्तकांमधून जी माहिती काढून द्यावी लागेल त्या विविध माहितीचीं पुस्तकें, चित्रें, नकाशे, सारसूचि, ग्रंथसूचि, लेखसूचि, घडिकें

पानके, मालिकें, कालिकें यांसारखी अनेक क्षणजीवी तशीच मुद्दाम राखून जतन करण्यासारखी साधनें सदैव सिद्ध ठेवील. बहुशः चालू लोकरुचीसाठीं अशीं अनेक क्षणजीवी साधनें फार उपयुक्त ठरतात. अशीं साधनें काळजीनें नि मोठ्या प्रमाणांत संदर्भ विभागामधील संग्रहांत तत्पर संदर्भ साहाय्यक हरघडी समाविष्ट करील. तशीच संदर्भ मागण्यांची व त्याकामीं पुरविलेल्या साहित्याची, भावी गरजूंनाहि शीघ्र उपयोगी व्हावी म्हणून कटाक्षानें व दूरदृष्टीनें तपशीलवार नोंद ठेवील.

**ग्रंथालयाची लोकप्रियता** — संदर्भसाह्य म्हणजे वाचक आणि ग्रंथ यांची त्या वाचकाला हवी त्या क्षणीं कुणा जाणकारानें घातलेली सांगड होय. आधुनिक काळांतल्या ग्रंथालयांच्या प्रसाराचें, वाढत असलेल्या वाचकसंख्येचें श्रेय ग्रंथालयाच्या समृद्धतेप्रमाणेंच संदर्भसाह्यकामीच्या सततच्या परिश्रमांकडेहि जाईल. जिज्ञासू, गरजू वाचकाभ्यासकांना हवी ती ती माहिती मिळवून देण्यासाठीं संदर्भ साहाय्यकानें घेतलेले कष्ट पहाणाऱ्या व जाणणाऱ्या वाचकांना आणि त्याच्याकडून नेमकी मिळालेली असंख्यविध माहिती उपयोगिणाऱ्यांना तो नेहमी हवाहवासा वाटेल. केवळ ग्रंथालयांतील पुस्तकाचीच काय, पण सर्व महत्त्वाच्या विषयाच्या एकूण प्रमुख ज्ञानसाधनांची व त्यांचा उपयोग कसा करावयाचा ही माहिती असलेला व ती वाचकांना लौकरांत लौकर मिळवून देणारा, न जिगजिगणारा, हंसतमुख संदर्भ-साहाय्यक वाचकांना सदैवच प्रिय राहील आणि त्याच्यामुळें ग्रंथालयहि तसें होईल.

**मराठींतील संदर्भग्रंथ निर्मिति**—संदर्भसाह्याच्या दृष्टीनें निश्चित संकेतांनुसार रचलेल्या व संदर्भाकामीं हमखास उपयोगी होणाऱ्या ग्रंथांस संदर्भग्रंथ म्हटलें जातें. गेल्या सुमारें दोनशे वर्षांतच असे ग्रंथ यूरप–अमेरिकेंत तयार झाले आहेत. या काळापैकीं गेलीं पंचवीसतीस वर्षेच सोडलीं तर त्यापूर्वीच्या दीडशेंवर वर्षांमध्यें आपला देश वैज्ञानिक, शैक्षणिक, सांस्कृतिक प्रगतीच्या दृष्टीनें मंद गोळा झालेला होता. त्यामुळें असे हवे ते ते संदर्भग्रंथ तयार होऊं शकले नाहींत. याहि बाबतींत आपणास पराकाष्ठेचें दारिद्य व अगतिकत्व प्राप्त झालें. त्याचा परिणाम आज संदर्भ पुरविणाऱ्या ग्रंथपालास फार भोगावा लागतो आहे. निर्जल मरुभूमींत पाण्याचें मुक्त वाटप करणाऱ्या कामावर नेमलेल्या माणसासारखीच आजच्या आपल्या ग्रंथालयांतल्या संदर्भसाह्यकाची स्थिति होते! आजपावेतों आपल्या वाचकाभ्यासकांना ग्रंथालयामध्यें कांहीं विशिष्ट माहिती असते व मिळते हीच माहिती नव्हती. ती मिळवावी अशी गरजहि वाटत नव्हती. पण आतां देशभर अनेक प्रकारची जागृति झालेली आहे. रोजच्या रोज कांहीं ना माहिती आपण मिळवावी व अशी माहिती मिळण्याचीं नेमकीं स्थळें असावीं असें सर्व लोकांना वाटूं लागलें आहे. मुक्तद्वार ग्रंथालयांमध्यें विविध वाचनीयांची सोय ठेवली जात

आहे. तेथें आजवर येत असलेले वाचक रुळत आहेत, नवेनवे रोज निर्माण होत आहेत. अनेक संदर्भ गरजूहि वारंवार कांहीं ना कांहीं संदर्भासाठीं वळत आहेत. त्यांना माहिती देण्याच्या दृष्टीनें आवश्यक संदर्भग्रंथ तयार होण्याची वेळ आली आहे.

**संदर्भ ग्रंथ लेखनाची तयारी**—वाचकांनीं मागितलेल्या माहितीतील कांहीं सावकाश शोध करून प्रयत्नानें मिळवून द्यावी लागते. या सावकाशीच्या संदर्भशोधामधूनच धीमेतेनें वाचकां लागणाऱ्या माहितीच्या संदर्भाचे सिद्ध ग्रंथ आपोआप तयार होत जातील. आपण बहुत वेळ आणि श्रम घेऊन गोळा केलेली माहिती केवळ स्मरणांत रहाणें प्रत्येक बाबतींत शक्य नाहीं. म्हणून ती सर्व माहिती, तिची उगमस्थानें—जें जें आपल्या शोधामध्यें हातीं आलें त्या त्या वर्षाची माहिती या कामाकरतांच सदैव परिपूर्ण ठेवावयाच्या ग्रंथालयसूचीच्या कपाटामधील संदर्भ शोधाच्या खणांमध्यें ( म्हणजे कॅटलॉग कॅबिनेटमधील ट्रे मध्यें ) सूचिपत्रांवर सविस्तर व विषयवार नोंदून लावून ठेवली जावी. या पत्रांवर स्थानांक, संदर्भविषयांचें नांव, माहिती ज्यांत आढळली त्या पुस्तकाचें नांव व पृष्ठांक हा तपशील क्रमानें संपूर्णपणें भरावा. संदर्भप्रश्नांची एक वेगळी फाइलहि ठेवावी. कालक्रमांत संदर्भपत्रांचा खणं व ही या संदर्भप्रश्नांची फाइल यांस अपरिमित महत्त्व प्राप्त होईल. हीं पत्रें व फाइल काळजीपूर्वक तयार केली व नित्य जुळविलेली ठेवली तर संदर्भशोधाचे अन्यथा होणारे अगणित श्रम वाचतील. आज अनेक स्थळीं हें काम व त्यासाठींच श्रम दुबार तिबार होत असतात. क्रमशः या सावकाशीच्या संदर्भप्रश्नांच्या उत्तरांमधून शीघ्र संदर्भांकरितां हमखास उपयोगी पडणारी माहिती फार मोठ्या प्रमाणांत गोळा होईल. यूरप व अमेरिका या देशांमध्यें अशा साधनांचा सतत उपयोग झाला आहे व होत आहे. विकास पावत असणाऱ्या आपल्या देशाला आपले संदर्भग्रंथ रचतांना या कामाचा निश्चितपणें कल्पनातीत उपयोग होईल. प्रथम संकीर्ण संदर्भ-ग्रंथ व त्यामागून अनुभव, अभ्यास व उत्कर्ष यांच्या प्रमाणांत विषयवार संदर्भ ग्रंथ यापुढें होऊं लागतील.

**संदर्भ सेवा** — असे संदर्भग्रंथ रचले जाऊं लागले कीं आज अनेक ग्रंथपालांच्या बाबतींत अनेकदां घडणारी एकच गोष्ट क्वचित् घडेल. आज अनेक ठिकाणी असें घडतें—सहज पुस्तकें चाळतां चाळतां ग्रंथपाल एकदम थबकतो व स्वतःशीच म्हणतो, " अरे, ह्या पुस्तकांत हें आहे. आतापर्यंत मला हें कसें दिसलें नाहीं ? त्या दिवशीं कसल्यांतले ते गृहस्थ हीच माहिती मागत होते. पण आम्हांला कोणालाच हें सांपडलें नाहीं. अजूनहि त्यांना हीं माहिती हवी असली नि ही आतां मिळाली तर केवढा तरी आनंद होईल त्यांना. काय बरं त्यांचा पत्ता ? " वाचकानें मागितलेली माहिती त्याच्या हातांत पडल्यावर त्याच्या चेहऱ्यावर ओसंडणारें समाधान हाच संदर्भ-साहाय्यकाच्या कामाचा नि श्रमाचा संपूर्ण मोबदला होय !

**नवी ग्रंथालयीन कामगिरी**—मानवी जीवितांत व विचारसरणींत कालाच्या ओघांत कल्पनातीत बदल झालेला आहे. प्रत्येक नवी पिढी मागल्या पिढीपेक्षां कांहीं तरी नवीन गोष्टी जीवनांत आणीत असते, कांहीं जुन्या ठेवीत असते, कांहीं टाकून देत असते. नव्या गोष्टी म्हणजेच पालट, बदल, फेरफार. 'ओल्ड ऑर्डर चेंजेथ यील्डिंग प्लेस टु न्यू' म्हणजे 'जुनें जाउनी नवीन येतें' या कल्पनेप्रमाणें ग्रंथालयक्षेत्रांतहि बदल होत आला. अमेरिकेंत याची प्रथमच मोठ्या प्रमाणांत आखणी जुळणी झाली. हा बदल ग्रंथालयक्षेत्रांत क्रांतिकारक ठरला. ही कामगिरी अमेरिकेंतील ग्रंथपालनमहर्षि मेल्व्हिल ड्यूई यांनीं केली. वाचकांपुढें मौन पाळणारे, त्यांना कांहीं साह्य न देतां दूर अंतरावर ठेवणारे ग्रंथपाल जेव्हां ड्यूईनीं पाहिले तेव्हां ग्रंथपालनाचें मर्म जाणणारा तो विचारवंत खिन्नितच झाला. त्यानें १८७६ सालीं अमेरिकन ग्रंथालयसंघाची स्थापना केली आणि त्याद्वारें "किमान खर्चांत जास्तींत जास्त वाचकांना शक्य तितकीं उत्तमांतलीं उत्तम वाचनीयें पुरविणें हें ग्रंथालयाचें ध्येय" त्यानें प्रकट केलें आणि सर्वत्रच्या ग्रंथपालांना कामाला लावलें. हें ध्येय जगभर पसरलें.

**नवीन दृष्टीचे टप्पे**—ग्रंथालय हा शब्द प्रथमारंभींचे ग्रंथ लिहिले गेले व संग्रहांत ठेवले गेले त्या प्राचीन काळापासून वापरात आला आहे. त्या काळीं जेथें पुस्तकें लिहिलीं जात त्या जागेला ग्रंथालय म्हणत. तेथें हळू हळू पुस्तक संख्या वाढूं लागली आणि अशा वाढत जाणाऱ्या संग्रहाला ग्रंथालय म्हटलें जाऊं लागलें. पुढें शिक्षणाचा प्रसार होत गेला. परिणामीं ग्रंथोत्पादन वाढलें. 'वाचावें' ही इच्छा लोकांमध्यें येऊं लागली; यामुळें ग्रंथालयाकडे पहाण्याचा लोकांचा दृष्टिकोन हळू हळू बदलला. केवळ ग्रंथजतनाची दृष्टि नाहीशी होऊन ग्रंथ लोकांना उपलब्ध करून देणें हें ग्रंथालयाचें कार्य गणलें जाऊं लागलें. ग्रंथालयें अस्तित्वांत आल्यावर बराच काळपर्यंत पाणी, आग, वाळवी व ग्रंथचोर यांच्यापासून ग्रंथांचें रक्षण करणें हेंच महत्त्वाचें ग्रंथालयकार्य असें मानलें जात होतें. शिक्षणाच्या प्रसाराबरोबर ग्रंथादि वाचनीयें लोकांना उपयोगाकरतां देणें महत्त्वाचें मानलें जाऊं लागलें. वाचनीयें केवळ उपलब्ध करून द्यावीं या उदार मतपरिवर्तनांतून विवक्षित गरजेला साह्यकर असणाऱ्या वाचनीयामधली विविध माहिती, ती मिळावी या इच्छेनें येणाऱ्यांना देत जावें हा ग्रंथालयाच्या मूळ हेतूंत क्रांतिकारक बदल घडून आला. म्हणजेच संदर्भसाह्याच्या कल्पनेचा उगम झाला. वाचकानें हवें म्हटलेलें पुस्तक काढून देणें हें प्रथमारंभीचें संदर्भसाह्य होतें तें बदलून त्याला हवी त्या विषयाची असेल तितकी माहिती झटपट काढून देणें हें ग्रंथालयाचें नवेंच एक ध्येय अलिकडे सर्वसंमत झालें आहे.

**व्युत्पन्न आणि प्रसन्न ग्रंथपाल**—पूर्वी साक्षर नि शिक्षित होणारांसाठीं वाचनीयांची सोय कांहींच नसे. याकडे कांहींच लक्ष न देतां केवळ सक्तीच्या प्राथमिक शिक्षणविषयींच कायदे करण्यांत आले. त्यांचा फोलपणा गेल्या महायुद्धांत पश्चिमी देशांच्या नजरेस आला. त्यांनीं अनुभवाचें तें मार्गदर्शन घेऊन लगेच ग्रंथालय कायदे सुधारले. ग्रंथालयें सर्वांस मुक्तद्वार झालीं. वाचनीयें लोकांस सुलभ झालीं. साहजिकच फार मोठ्या प्रमाणांत ग्रंथालयांची वाढ झाली व वाढत्या ग्रंथालयोपयोगामुळें संदर्भसाह्य हें नवें काम ग्रंथपालांपुढें आलें. 'योग्य वाचकाला हवीशी वाटणारी योग्य ती ती माहिती त्याची गरज समजून घेऊन योग्य वेळीं आत्मीयतेनें देणें म्हणजे संदर्भसाह्य' ही पद्मश्री डॉ. रंगनाथन् यांनीं स्पष्ट केलेली कल्पना पुढें घेतली गेली. अर्थात् या कामाकरतां जीं माणसें ग्रंथालयांत असावयाचीं, तीं मुळांत व्युत्पन्नतेच्या दृष्टीनें पारखलेलीं व सदैव प्रसन्न मनानें आपल्या कामात मग्न रहातील अशा संपन्नतेच्या परिस्थितींत राखलेलीं असलीं पाहिजेत. आधुनिक काळांत ग्रंथपालनांतील ज्या नव्या नव्या कल्पना या देशांत रुजत आहेत त्यांतलीच एक संदर्भसाह्य ही आहे. त्या कल्पनेचा सेवासक्त व परिश्रमी ग्रंथपालांकडून आचार व प्रचार अविरत होत जावो !

---

## 'संदर्भसाह्य' ह्या विषयावरचीं कांहीं इंग्रजी पुस्तकें


अलेक्झांडर (सी.) व वर्क (ए. जे.) — हाऊ टु लोकेट एज्युकेशनल इन्फर्मेशन अँड डेटा. १९५८.

इलियट (सी. ए.) — लायब्ररी पब्लिसिटी अँड सर्व्हिस. १९५१.

कॉलिसन (आर्. एल्.) — इन्फर्मेशन सर्व्हिसेस, देअर ऑर्गनायझेशन अँड ॲडमिनिस्ट्रेशन. १९५०.

कॉलिसन (आर्. एल्.) — लायब्ररी ॲसिस्टन्स टु रीडर्स. १९५०.

क्लार्क (जे. ए.) — रिसर्च मटीरियल इन् दि सोशल सायन्सेस. १९५९.

जोएकेल (सी. बी.) — रीचिंग रीडर्स, टेक्निक्स ऑफ एक्स्टेंडिंग लायब्ररी सर्व्हिसेस. १९४९.

पारखी (र. श.) — रेफरन्स सर्व्हिस इन् लायब्ररीज. १९४५.

फॉस्केट (डी. जे.) — ॲसिस्टन्स टु रीडर्स इन् लेंडिंग लायब्ररीज. १९५२.

फॉस्केट (डी. जे.) — इन्फर्मेशन सर्व्हिस इन् लायब्ररीज. १९५८.

बॅग्ले (डब्ल्यू. ए.) — फॅक्ट्स् अँड हाउ टु फाइंड देम. १९५८.

मॅक्कॉल्व्हिन (एल्. आर्.) — रेफरन्स लायब्ररी स्टॉक. १९५२.

,, — हाऊ टु फाइंड.

,, — हाऊ टु यूज बुक्स.

मज् (आय्. जी.) संपा. — विंचेल्स गाइड टु रेफरन्स बुक्स. आ. ७. १९५१.

मर्फी (रॉबर्ट) — हाऊ अँड व्हेअर टु लुक् इट् अप्. १९५८.

मुखर्जी (ए. के.) — मॅन्युअल ऑफ रेफरन्स सर्व्हिस. १९५७.

रंगनाथन् (एस्. आर्.) व सुंदरम् — रेफरन्स सर्व्हिस. १, १९४०.

,, व शिवरामन् — ,, २. आ. २. १९६१.

रॉथ्स्टीन (एस्.) — डेव्हलपमेंट ऑफ रेफरन्स सर्व्हिसेस. १९५५.

वॉर्नेर (जे.) — रेफरन्स लायब्ररी मेथडस्. १९२८.
वॉल्फर्ड (ए. जे.) — गाइड टु रेफरन्स मटीरिअल. १९५९.
विंचेल (कॉंस्टंस) — गाइड टु रेफरन्स बुक्स. आ. ७. संपा. मज्. १९५१.
शोअर्स (एल्.) — बेसिक रेफरन्स वर्क्स. आ. २. १९५४.
,, — बेसिक रेफरन्स सोर्सेस. १९५४.
श्नीडर (जी.) — थिअरी अँड हिस्टरी ऑफ बिब्लिऑग्राफी. १९३४.
सिंजर (टी. ई. आर्.) — इंफर्मेशन अँड कॉम्युनिकेशन प्रॅक्टिस इन इंडस्ट्रीज. १९५८.
स्टुअर्ट (जे. डी.) — हाऊ टु यूज ए लायब्ररी. १९१०.
हचिन्स (एस्.) — इंट्रोडक्शन टु रेफरन्स वर्क. १९५६.

## संदर्भसाह्य विषयक कांहीं मराठी लेख


उमराणीकर ( हेमंत ) — इंग्रजींतील कांहीं शतायुषी वार्षिकें. केसरी ५।८।६२.

कोल्हटकर ( वा. पु. ) — ग्रंथालयांत येणारीं मालिकें. केसरी २२।१।६०.

„ — मराठी ग्रंथसूची. विशाल सह्याद्रि ३।७।६१.

„ — ज्ञानकोशांविषयीं. लोकसत्ता ११।७।६१.

टिकेकर ( श्री. रा. ) — विश्वकोश. मनोहर, फेब्रुआरी ६२.

„ — पदनामकोश. मनोहर, जानुआरी ६३.

पर्वते ( त्र्यं. वि. ) — गॅझेटियर्स म्हणजे काय ? मनोहर, फेब्रुआरी ५९.

महाजन ( शां. ग. ) — शालेय ग्रंथालयांसाठीं उपयुक्त संदर्भग्रंथांची सूची. साहित्य सहकार, जानुआरी ५९.

माडखोलकर ( ग. त्र्यं. ) — ज्ञानकोश. ( वाङ्मयविलासमधील लेख ).

राजवाडे ( वि. का. ) — राष्ट्रीय मराठी कोश. राजवाडे लेखसंग्रह २— संकीर्ण निबंधमधील लेख.

सातोस्कर ( बा. द. ) — शब्दकोश. अमृत, जून ५४.




# प्रश्नावलि

संदर्भग्रंथ व संदर्भसाह्य पद्धति यांविषयीं.

(१) ग्रंथपालाकडून नेमकी व त्वरित माहिती मिळण्यासाठीं वाचक ग्रंथपालाला कोणत्या प्रकारें साह्य देऊं शकेल ? याउलट ग्रंथपाल तशी माहिती काढून देत असतां वाचकांकडूनच कसे अडथळे येऊं शकतील ?

(२) "ग्रंथालयांतील पुस्तकांची मांडणी वर्गीकृत असते" हें खरें असलें तरी एका गोष्टीकरतां यास अपवाद होतो व विविध वर्गांमधले ग्रंथ एकत्र ठेवलेले आढळतात. कोठें ? कसें ? कां ?

(३) संदर्भग्रंथांचे बाबतींत प्रसिद्धिवर्ष, आवृत्तिक्रमांक, अनुक्रमणिका, अभ्याससूचि, उल्लेखसूची यांचें काय महत्व आहे ? उदाहरणें देऊन सांगा.

(४) अनुक्रमणिका व उल्लेखसूची यांच्या रचनेंत कोणता फरक असतो ? यांपैकीं कोणत्या भागामुळें ग्रंथरचनेचा आराखडा मिळेल ? एखाद्या विवक्षित मुद्याची नेमकी माहिती कोणत्या भागामुळें चटकन सांपडेल ?

(५) 'अमृताहुनि गोड नाम तुझें देवा' हा नामदेवाचा अभंग एका आकाशवाणी गायिकेला चटकन हवा आहे. तो मिळवून देण्यासाठीं कोणतें साधन वापराल ?

(६) संदर्भग्रंथांचें मूल्य ठरवितांना ज्या महत्त्वाच्या गोष्टींचा विचार करावा लागतो त्यांपैकीं चार सांगा.

(७) पुढे कांहीं विवक्षित शब्द दिले आहेत आणि तितकींच स्पष्टीकरणें दिलेलीं आहेत. त्या त्या स्पष्टीकरणानें ज्याचा बोध होतो तो शब्द शोधा—

१. परिशिष्ट. २. प्रस्तावना. ३. शिलामुद्रित. ४. मुखपृष्ठाच्या पाठीवरचें वर्ष. ५ लेखकाचें मनोगत. ६. अनुक्रमणिका. ७. मुद्रणहक्काचें वर्ष. ८. अभ्याससूचि. ९. सुधारलेली आवृत्ति.

ग्रंथ लेखकाचा हेतु यानें समजतो.

यानें विषयाची पूरक माहिती मिळते.

पुस्तक प्रथम केव्हां प्रसिद्ध झालें तें यावरून समजतें.

पुस्तक केव्हां मुद्रित झालें तें येथें आढळतें.

पुस्तकांतील विवेचनाची स्थूल कल्पना यानें येते.

कांहीं बदल करून छापलेली आवृत्ति.

पुस्तकांची एक यादी.

एकूण विवेचनांतील मुख्य मुद्दे व त्यांची मांडणी यानें कळते.
यानें मुद्रणाचा प्रकार दिसून येतो.

(८) महाराष्ट्र शब्दकोश व मराठी भाषेचा सरस्वतीकोश समोर घेऊन त्यांची तुलना करा.

(९) ज्ञानकोशाचा अद्ययावत्पणा कोणत्या रीतीनें साधतां येईल याविषयीं सोदाहरण सांगा.

(१०) कोणत्या संदर्भग्रंथांमध्यें पुढील माहिती नेमकी मिळूं शकेल ?

दिवंगत साहित्यिक. शब्दांचे बिनचूक उच्चार. म्हणी. पुराणकालीन व्यक्तींचीं चरित्रें. जिल्ह्यांच्या सरहद्दी. विज्ञानविषयक पारिभाषिक शब्द.

(११) तुम्हाला सुमारें ३५ रु. दिले व म्हटलें कीं दोन चांगलीं नियतकालिकें सुरूं करा. तीं कोणतीं दोन ? कां ?

(१२) मराठी कालिकांमध्यें येणाऱ्या लेखांची सूचि तुम्हांला कोठें दिसली आहे का ? संदर्भसाह्याच्या दृष्टीनें तुमचा अभिप्राय द्या.

(१३) ग्रंथालयीन संदर्भसाह्याचे प्रकार सांगा. संदर्भसाह्यासाठीं ग्रंथपाल कोणती तयारी करतो ?

(१४) सार्वजनिक ग्रंथालयामधील संदर्भसाह्याचें स्वरूप कसें असतें तें सोदाहरण सांगा.

(१५) शीघ्र संदर्भसाह्य व सावकाशीचे संदर्भसाह्य यांची ग्रंथालयाचा प्रकार व संदर्भसाधनें यांच्या अनुषंगानें तुलना करा.

(१६) संदर्भसाह्य म्हणजे काय ? ग्रंथपालाचा दुसरा सिद्धांत 'प्रत्येक वाचकाचें वाचनीय आहे' याच्या अनुषंगानें संदर्भसाह्याची आवश्यकता कोणती ?

(१७) वाचकांच्या गरजा भागविण्याच्या दृष्टीनें संदर्भसाह्यविभागाची रचना कशी कराल तें सविस्तर सांगा.

(१८) "संदर्भसाह्याच्या एकूण कामाच्या तयारीचे दृष्टीनें तीन पायऱ्या असतात—साधनांची पूर्वतयारी, मांडणी व संकलन." सांगोपांग चर्चा करा.

(१९) पुढील संदर्भग्रंथांतून कोणत्या प्रकारच्या प्रश्नांची माहिती मिळते ?— (अ) पॅरामाऊंट उद्योगमार्गदर्शिका. (आ) हू इज हू (इ) एन्सायक्लोपीडिआ ऑफ सोशल सायन्सेस. (ई) इंडिआ ए रेफरन्स ॲन्युअल. (उ) दूरभाषकसूची (=फोनडिरेक्टरी).

(२०) खालील संदर्भग्रंथांवर टीपा द्या. त्यांमधून कोणत्या संदर्भप्रश्नांचीं उत्तरें मिळतात ? —(अ) एशियन रेकॉर्डर. (आ) पुणें डिरेक्टरी. (इ) अर्वा-

चीन मराठी वाङ्मय् सेवक. (ई) एन्सायक्लोपीडिआ ऑफ रिलिजन अँड ईथिक्स. (उ) इंडियन सायकॉलॉजिकल टर्मिनॉलॉजी. (ऊ) धर्मसिंधु.

(२१) कोणत्याहि पांच विषयांतील परिभाषा कोशांचें एक एक उदाहरण द्या व त्यांतील दोनांचें साग्र वर्णन करा.

(२२) खालील माहिती कोणत्या प्रकारच्या ग्रंथांतून मिळवाल ?— (अ) जोतिबा फुले चरित्र. (आ) 'दात आहेत पण चणे नाहींत' याचा अर्थ. (इ) पत्रांचे मायने. (ई) 'सत्यविजय' नाटकाचे प्रयोग हक्क. (उ) १९४१ ते १९५० मध्यें प्रसिद्ध झालेलीं पदार्थविज्ञानाचीं मराठी पुस्तकें. (ऊ) व्हीनस बुक स्टॉल प्रकाशनें.

यांपैकीं दोनांचें सविस्तर वर्णन करा.

(२३) रचना व व्याप्ती या दृष्टीनें टीपा द्या — (अ) विज्ञानबोध संपा. माटे. (आ) मध्ययुगीन चरित्रकोश – संपा. चित्राव. (इ) मराठी ग्रंथसूचि शं. ग. दाते. (ई) महाराष्ट्रीय ज्ञानकोश – केतकर. (उ) बुक ऑफ कोटेशन्स.

(२४) वृत्तपत्र कचेरीला उपयुक्त होतील अशा हिंदुस्थानांतील संदर्भग्रंथांची माहिती देणारें टिपण लिहा.

(२५) ग्रंथालयांतील संदर्भसाह्याचें स्वरूप ग्रंथालयाच्या प्रसारावर अवलंबून असतें ? स्पष्ट करा.

(२६) पुढील संदर्भग्रंथांचें रचनेच्या दृष्टीनें विवेचन करा—(अ) संकेत कोश. (आ) निर्फोर गाइड. (इ) गॅझेटियर ऑफ दि पूना डिस्ट्रिक्ट. (ई) पूना टेलिफोन डिरेक्टरी. (उ) मराठी सरस्वती कोश. (ऊ) व्यायाम ज्ञानकोश.

(२७) "संदर्भ साहाय्यकाच्या अंगीं भरपूर माहिती, बुद्धिमत्ता वगैरे गुणांबरोबरच ज्ञानलालसा, निरलसता, कर्तव्यतत्परता हे गुण असले पाहिजेत." हें विधान तुम्हास मान्य आहे का ? विवेचन करा.

(२८) स्पष्टीकरणासहित व्याख्या द्या—(अ) तात्कालिक संदर्भ साह्य. (आ) सांवत्सरिक. (इ) मासिक. (ई) संदर्भ ग्रंथ. (उ) दिनविशेष ग्रंथ म्हणजे डिक्शनरी ऑफ डेटस्. (ऊ) अभ्याससूचि.

(२९) विस्तृत टिपणें लिहा—(अ) भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश–र. भा. गोडबोले. (आ) कीझिंग्ज कॉंटेंपररी आर्काइव्हज्. (इ) ऑल इंडिया सिव्हिल लिस्ट. (ई) टाइम्स ऑफ इंडिया डिरेक्टरी. (उ) पोस्ट अँड टेलिग्राफ डिरेक्टरी.

(३०) शब्दकोशाच्या आरंभीं व शेवटीं कोणती माहिती आढळते ? तिचा उपयोग कोणता ?

## कांहीं संदर्भ प्रश्न

### पुढील प्रश्नांकरितां कोणत्या संदर्भ ग्रंथांचा व साधनांचा उपयोग कराल ?

क) १) नॅशनल केमिकल लॅबोरेटरी संबंधीं माहिती.

२) अमेरिकेंतील सार्वजनिक ग्रंथालयें.

३) गौरीशंकर पर्वत.

४) मॅकमोहन रेषा.

५) मुद्रित शुद्धीकरितां ( *Proof-Correction* ) कोणतीं चिन्हें वापरलीं जातात ?

६) जपानच्या राष्ट्रध्वजाचें वर्णन.

७) अणु म्हणजे काय ?

८) गुलाल कसा तयार करतात ?

९) ' घटोत्कचाची माया ' म्हणजे काय ?

१०) सोनें शुद्ध कसें करतात ?

ख) १) नोबेल पारितोषिकाचा इतिहास. भारतांत आतांपर्यंत कोणाकोणास तें मिळालें आहे ?

२) बॅडमिंटनच्या खेळाकरितां लागणाऱ्या जागेचें ( Court ) मोजमाप.

३) कवी ' बी ' यांचें संपूर्ण नांव व त्यांचें वाङ्मयीन कार्य.

४) ' एडन ' बंदराचा राज्यकारभार कसा चालतो ?

५) ऑस्ट्रेलियामध्यें भारतीय राजदूत कोण आहेत ? त्यांचा तेथील पत्ता.

६) सुएझ कालव्याची लांबी व खोली.

७) ' नवें जग ' हें मासिक केव्हां सुरू झालें ?

८) ( भारतांत प्रसिद्ध होणारीं ) ग्रंथपालनशास्त्रविषयक इंग्रजी मासिकांचीं नांवें.

९) पेनिसिलीनचा शोध कोणी लावला ?

१०) सर सी. व्ही. रामन यांचा परिचय.

ग) १) मुंबईमध्यें गुजराती व हिंदी भाषेत कोणतीं दैनिकें व साप्ताहिकें प्रसिद्ध होतात ?

२) 'निर्णायक मत' (Casting Vote) म्हणजे काय ?

३) द्विदल राज्य पद्धति म्हणजे काय ?

४) डॉ. एस्. राधाकृष्णन् यांचा परिचय.

५) कलकत्ता शहराची लोकसंख्या.

६) म्हैसूरची समुद्रसपाटीपासून उंची.

७) कालिदासाच्या 'मेघदूत' काव्याचें मराठींत भाषांतर झालें आहे काय ? 'मेघदूता 'संबंधीं कांहीं ग्रंथ उपलब्ध आहेत का ?

८) मुंबईमध्यें चित्रपटगृहें किती आहेत ?

९) उंच उडीचा जागतिक उच्चांक कोणाचा आहे ?

१०) रणजी करंडकाच्या सामन्यांतील आजपर्यंतचे विजेते.

घ) १) पुणें महानगरपालिकेची स्थापना केव्हां झाली ?

२) मराठवाडा विद्यापीठाचे उपकुलगुरू कोण आहेत ?

३) भारतामध्यें १९६१ सालीं साखरेचें उत्पादन किती झालें ?

४) 'एकादशीच्या घरीं शिवरात्र' ह्या वाक्प्रचाराचा अर्थ.

५) 'शेवटची घर घर' ह्या शब्दप्रयोगांतील घर घर शब्द कसा प्रचारांत आला ?

६) शीख पंथाचा पवित्र ग्रंथ कोणता ?

७) 'दिल्ली ते मुंबई' प्रवासाचे उपलब्ध मार्ग, प्रवासास लागणारा वेळ इ.

८) भारताचें राष्ट्रीय ग्रंथालय कोणतें ?

९) भारताच्या किनाऱ्यावरील महत्त्वाचीं दीपगृहें कोठें आहेत ?

१०) अंदमान – निकोबारची राज्यव्यवस्था

च) १) स्वातंत्र्यवीर सावरकर यांनीं कोणकोणतीं नाटकें लिहिलीं आहेत ?

२) viz, ibid ह्या शब्दांचा अर्थ काय ?

३) ईश्वरचंद्र विद्यासागर यांचा परिचय.

४) विष्णुपुराण.

५) १९५७ भारतानें किती चहा निर्यात केला ?

६) 'भद्रावती' योजनेसंबंधीं माहिती.

७) गुजरातमधील प्रमुख उद्योगधंदे कोणते ?

८) 'जलविद्युत् योजना' म्हणजे काय ? अशा योजना महाराष्ट्रांत आहेत काय ? असल्यास कोणत्या ?

९) अलिबागच्या वेधशाळेसंबंधीं माहिती.

१०) शेख अब्दुल्ला यांचेबद्दल माहिती.

छ) १) ॲन्ड्रयू कार्नेजी, रॉकफेलर यांचीं चरित्रें.

२) बालवीर संस्थेच्या चळवळीसंबंधीं माहिती.

३) महाराष्ट्राच्या विधानसभेच्या सभासदांची संख्या.

४) (SRC म्हणजे स्टेटस् रीऑर्गनायझेशन कमिटी) प्रांत पुनर्रचना समितीचे सभासद कोण होते ?

५) नेपाळमधील सध्याच्या राज्यव्यवस्थेसंबंधीं माहिती.

६) 'ताजमहाल' संबंधीं विशेष माहिती.

७) 'काकतालीय न्याय' म्हणजे काय ?

८) मुंबई हायकोर्टाचें स्थापना वर्ष.

९) 'अडकित्ता' हा शब्द प्रचारांत कसा आला ?

१०) केरळ राज्याचे राज्यपाल कोण आहेत ?

ज) १) गोव्यामधील प्रसिद्ध देवालयांची माहिती.

२) 'मानसशास्त्रावर मराठींत पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत का ?

३) प्राचीन् लेखनकलेसंबंधीं माहिती ?

४) 'गिरसप्पाचा धबधबा' व 'जोग फॉल्स' एकच का ?

५) खोखोच्या खेळासंबंधीं माहिती.

६) 'मेघमल्हार' रागाबद्दल माहिती.

७) खिश्चन धर्मगुरू पोपची माहिती.

८) बारा बलुतेदार.

९) जॉर्ज बर्नार्ड शॉ संबंधीं मराठींत पुस्तक उपलब्ध आहे का ?

१०) मद्रासमधील कातड्याच्या व्यापाऱ्यांचे पत्ते.

झ) १) प्रार्थना समाजाबद्दल माहिती.
२) भारतांतील सर्वांत मोठी नदी.
३) अजंठा-वेरूळ लेण्यांसंबंधीं माहिती.
४) 'बापू गोखले' यांचें थोडक्यांत चरित्र.
५) वि. वा. हडप यांनीं लिहिलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्याचीं नांवें.
६) जमिनीच्या खरेदी वेळीं कागदपत्र करतांना किती 'स्टँप फी' पडते ?
७) 'श्वेत पत्रिका' ( White Paper ) म्हणजे काय ?
८) राष्ट्रपतींना 'वटहुकूम' केव्हां काढतां येतो ?
९) यूनो संघटनेंची सभासद राष्ट्रें किती आहेत ?
१०) अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांमध्यें किती संस्थानांचा समावेश होतो ?

ट) १) दंडकारण्याबद्दल माहिती.
२) अश्वमेध यज्ञाची माहिती.
३) ललितकला अकॅडमी कोठें आहे ?
४) भारताच्या राज्यसभेचे व लोकसभेचे अध्यक्ष कोण आहेत ?
५) भारतामध्यें आकाशवाणीचीं एकूण केंद्रें किती आहेत ?
६) ज्ञानेश्वरीचीं इंग्रजी भाषांतरें झालीं आहेत का ?
७) युद्धशास्त्रावर मराठींत पुस्तकें उपलब्ध आहेत का ?
८) अमेरिकन डॉलरची भारतीय चलनांत किंमत.
९) भारतांतून जर्मनीमध्यें हवाईमार्गें पत्र पाठविण्याचे दर.
१०) 'पद्मासन' म्हणजे काय ?

ठ) १) जपानमध्यें प्रचलित असलेल्या नाण्याचें नांव.
२) सिंगापूरची लोकसंख्या.
३) 'ना खंत, ना खेद' ह्या पुस्तकासंबंधीं माहिती.
४) पंडित जवाहरलाल नेहरू ह्यांच्या 'Glimpses of the world History'
५) १९६१ मध्यें भारतीय संसदेनें किती नवे कायदे केले ?
६) भारतीय नाविक दलाचे प्रमुख कोण ?
७) १९६० मध्यें पद्मश्री हा किताब कोणत्या समाजसेवकास मिळाला ?
८) प्राप्तीकराच्या दरांचें कोष्टक.
९) भारतांत एकूण वृत्तसंस्था ( News Agency ) किती आहेत ?
१०) भारतास स्वातंत्र्य मिळालें तेव्हां इंग्लंडचे प्रधानमंत्री कोण होते ?

ड:) १) भगवा झेंडा. (२) यूनोची कार्यपद्धति. (३) जगांतील देशांच्या राजधान्या. (४) 'चाक'–इतिहास. (५) कामधेनू. (६) शांताकारं भुजगशयनंचें वृत्त. (७) गोंद तयार करण्याची कृति. (८) प्राग्ज्योतिष, वज, पांड्य. (९) विज्ञानानें मानवी जीवन सुखी झालें आहे कीं दुःखी ? (१०) शितो धर्म.

ढ) १) घटनेनुसार हिंदीचें स्थान. (२) विज्ञानविषयक मराठी वाङ्मय. (३) राष्ट्रगीतें. (४) पण लक्षांत कोण घेतो, विश्ववाकुमारी, न पटणारी गोष्ट, स्मृतिचित्रे यांच्या नायिका. (५) दौलतच्या आवृत्त्या व त्यांची प्रसिद्धी वर्षे. (६) प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशन, पुणें. (७) पारशांचे सण. (८) भारतीय व मराठी चित्रपट. (९) विद्यार्थी अधिक उच्छृंखल होत आहेत काय ? (१०) मराठी ग्रंथालयांची यादी.

ण) १) सुगंध व पेपरमिंट यांची कृति. (२) चंद्रशेखर व भालचंद्र यातला फरक. (३) विश्वेश्वरअय्यांचा फोटो. (४) वामनपंडितकृत तुकाराम वर्णन. (५) कळसूबाई. (६) पंचरात्रें. (७) वाङ्मयविशारदचीं अभ्यास पुस्तकें. (८) खंडोबाची आरती व साधनें. (९) महिषासुरमर्दिनी स्वरूप. (१०) आपल्या नगरपालिकेच्या सदस्यांचीं नांवें.

———०———

## उल्लेखसूचि